## नव्या रुपात प्रकाशित



शिवपार्वतींना प्रसन्न करून सप्तर्षी नाडीग्रंथ निर्मितीचे वरदान मागताना

'चला नवग्रह मंदिर यात्रेला' आणि 'नॉस्ट्रॅडेमसपेक्षा अद्भूत' या पुस्तकातील एकत्रित मजकुरासह महाराष्ट्रातील नाडी केंद्रांचे पत्ते

# नाडी ग्रंथ भविष्य अंतरंग

**लेखक – शशिकांत ओक**

किंमत – रु. १५०

## श्रेय निर्देश



नाडीग्रंथांवरील नव्याने २०१६ मधे प्रकाशित होणाऱ्या या पुस्तक निर्मितीचे श्रेय खेडचे (रत्नागिरी) उद्योजक आणि शिक्षणतज्ज्ञ श्रीमान हिराभाई बुटालांना जाते.

नाडीग्रंथ महर्षींच्या महान कार्याची महती ते ओळखून आहेत आणि सामान्य व्यक्तिच्या जीवनातील समस्यांवर निरपेक्ष भावनेने सांगितला जाणारा उपाय करायची हिम्मत त्यांच्याकडून मिळते. त्यांच्या पायाशी बसून अनेकांनी आपापल्या समस्यांचे निवारण करून घेतले असे सांगणारे मला ज्ञात आहेत. माझा त्यांच्याशी परिचय नाडीग्रंथाच्या निमित्ताने तांबरमला असल्यापासून आहे. जेष्ठ चिरंजिवाच्या वियोगाची तळमळ काळाच्या आवेगाने मागे सरकली असली तरी त्यांचा अंतरिक शोध मात्र तितक्याच जोमाने चालू असतो. संत महात्म्यांचे आशीर्वाद, अनेक तीर्थक्षेत्रांच्या भावपुर्ण भेटी, यातून त्यांचे जीवनकार्य सतत अध्यात्मिक संगतीत व्यतीत होते. त्यांच्या सारख्या चारित्रसंपन्न, साहसी आणि सहृदयी व्यक्तिमत्वाने साऱ्या कोकणातच नव्हे महाराष्ट्रातील उद्योजकांना व शिक्षण क्षेत्रातील दिग्गजांना आदर्श घालून दिला आहे.

आत्तापर्यंत त्यांनी हजारोंच्या संख्येने नाडीभविष्य पुस्तकाच्या प्रती कधी प्रकाशकांकडून मागवून तर कधी पूर्ण पुस्तक झेरॉक्स करून गरजूंना वाटल्या आहेत. मराठीतील नाडीग्रंथावरील पुस्तक गेली ३ वर्षे बाजारात उपलब्ध नव्हते. मराठीतील नाडीग्रंथ विषयावरील पुस्तकाची ही गैरसोय या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी त्यां नी पुढाकार घेऊन छपाईचे काम खेडच्या अनंत मुद्रणालयाकडे सोपवल्याने ही आवृत्ती हिराभाईंना अर्पण आहे. असो.


✻ प्रकाशक ✻

नवीन आवृत्ती

ऑगस्ट २०१६

✻ मुद्रक ✻
अनंत मुद्रणालय,
खेड, जि. रत्नागिरी.

# प्रस्तावना

नाडी ग्रंथांची ओळख मराठी लोकांना आता नवलाईची राहिली नाही. गेल्या २० वर्षांच्या पेक्षा जास्त काळात महाराष्ट्रातील अनेक शहरात नाडी ग्रंथ भविष्य पहाण्याची – अनुभवायची सोय आता झाली आहे. नाडीग्रंथांवरील नव्याने २०१६ मधे प्रकाशित होणाऱ्या या पुस्तक निर्मितीचे श्रेय खेडचे (रत्नागिरी) उद्योजक आणि शिक्षणतज्ज्ञ श्रीमान हिराभाई बुटालांना जाते.

मराठीतील नाडीग्रंथावरील पुस्तक गेली ३ वर्षे बाजारात उपलब्ध नव्हते. नाडीग्रंथ महर्षींच्या महान कार्याची महती ते ओळखून आहेत आणि सामान्य व्यक्तिच्या जीवनातील समस्यांवर निरपेक्ष भावनेने सांगितला जाणारा उपाय करायची हिम्मत त्यांच्याकडून मिळते. त्यांच्या पायाशी बसून अनेकांनी आपापल्या समस्यांचे निवारण करून घेतले असे सांगणारे मला ज्ञात आहेत. माझा त्यांच्याशी परिचय नाडीग्रंथाच्या निमित्ताने तांबरमला असल्यापासून आहे. जेष्ठ चिरंजिवाच्या वियोगाची तळमळ काळाच्या आवेगाने मागे सरकली असली तरी त्यांचा अंतरिक शोध मात्र तितक्याच जोमाने चालू असतो. संत महात्म्यांचे आशीर्वाद, अनेक तीर्थक्षेत्रांच्या भावपुर्ण भेटी, यातून त्यांचे जीवनकार्य सतत अध्यात्मिक संगतीत व्यतीत होते. त्यांच्या सारख्या चारित्रसंपन्न, साहसी आणि सहृदयी व्यक्तिमत्वाने साऱ्या कोकणातच नव्हे महाराष्ट्रातील उद्योजकांना व शिक्षण क्षेत्रातील दिग्गजांना आदर्श घालून दिला आहे.

आत्तापर्यंत त्यांनी हजारोंच्या संख्येने नाडीभविष्य पुस्तकाच्या प्रती कधी प्रकाशकांकडून मागवून तर कधी पूर्ण पुस्तक झेरॉक्स करून गरजूंना वाटल्या आहेत. मराठीतील नाडीग्रंथ विषयावरील पुस्तकाची ही गैरसोय या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी पुढाकार घेऊन छपाईचे काम खेडच्या अनंत मुद्रणालयाकडे सोपवल्याने ही आवृत्ती हिराभाईंना अर्पण आहे. असो.

नाडी ग्रंथांचा परिचय मराठी भाषिकांना वाङ्मयशोभेच्या सन १९५९ व ६३ दिवाळीअंकातील कै. शांताराम आठवले यांच्या भृगु संहितेवर लेखातून झाला. ते लेख तेंव्हा खूप लोकप्रिय झाले. १९६८च्या दसऱ्याच्या मुहुर्तावर त्या लेखात आणखी भर घालून एकत्रित पुस्तक निर्मित झाले त्याचे नाव होते – नाडी ग्रंथ – एक अभ्यास. आजही हे पुस्तक नाडीग्रंथांवरील माहिती देणारे पहिले पुस्तक मानले जाते. आनंद साने यांनी या पुस्तकाला १९९७ साली पुन्हा प्रकाशित करून वाचकांची फार सोय केली आहे.

सन १९९४ –९५ साली नाडी ग्रंथांवर स्वतंत्रपणे पुस्तक प्रसिद्ध करायचा श्री आनंद साने यांनी मला दिलेला सल्ला फार मोलाचा ठरला. त्यावेळ पासून हवाईदलातील निवृत्त विंग कमांडर शशिकांत ओक या प्रस्तूतच्या लेखकाला, विविध भाषेतील पुस्तकातून, भाषणातून, चर्चेतून या विषयाला चांगलाच उजाळा देता आला. मराठी वाचकांची उत्सुकता प्रचंड प्रमाणात जाग्रृत होऊन हजारोंच्या संख्येने नाडी ग्रंथांचे अवलोकन केले जाऊ लागले. त्यातूनच मुंबई, पुणे, नागपूर, कोल्हापुर, सांगली, सोलापुर, अकोला, नाशिक, जळगाव, धुळे आदि शहरात नाडी ग्रंथ केंद्रांची स्थापना झाली. त्यांची महाराष्ट्रातील सध्या संख्या ५०च्यावर आहे. संपुर्ण भारतात देखील नाडी केंद्रांचे जाळे पसरले आहे. ३००पेक्षा जास्त नाडी केंद्रांच्या पत्याची यादी नुकतीच ‘‘Naadi Predictions - A Mind

Boggling Miracle '' व नाडीग्रंथ भविष्य – चौंका देनेवाला चमत्कार या अनुक्रमे इंग्रजी व हिंदी पुस्तकात उपलब्ध आहे. शिवाय तमिळ, गुजराथी व झेक या युरोपीय भाषेत पुस्तके प्रकाशित झाली आहे. कानडीतून लेखमलिकेच्या स्वरूपात 'कर्मवीरा' या साप्ताहिकातून काही भाग प्रकाशित झाला आहे.

काही महिन्यांपासून 'हैयो हैयैयो' उपनावाने लेखन करणाऱ्या अनेक भाषा व लिपितज्ज्ञ व्यक्तीने तमिळभाषेच्या, लिपीच्या अनुषंगाने नाडी ग्रंथ ताडपट्यांचा अभ्यास करून अनेक धक्कादायक माहिती प्रकाशात आणली आहे. पैकी एक लेख त्यांनी मराठीतील इथे सादर केला आहे.

नाडीग्रंथ तथाकथित विज्ञानवाद्यांना आव्हानाचा विषय झाला नाही तरच नवल! त्यांच्या आधारस्तंभांशी झालेल्या वादविवादातून त्यांच्या विचारांचा कोते व खोटेपणा साधार स्पष्टकरून त्यांच्या संस्थेचा धडधडीत पराभव झाला असे म्हणणारे बोध अंधश्रद्धेचा नामक पुस्तक प्रचंड खळबळ माजवून आहे. मात्र अशा संस्था आपली फजिती व पराभव झाला असे कधीच मान्य करत नाहीत व करणार नाहीत. म्हणून आधूनमधून व इंटरनेटवरून हीन शब्दात टिंगल टवाळी, चेष्टा करण्यात आनंद मानतात. अशा काहींच्या प्रतिक्रिया लेखांसोबत मासल्यासाठी सादर केल्या आहेत.

तरुणाईच्या हातात सतत असलेल्या मोबाईलमधून नाडी भविष्य विषयावर ऍप्स आता उपलब्ध आहेत. गूगल प्ले स्टोअर वरून ते Naadi Grantha Predictions असे टाईप केले की ते डाऊनलोड करता येतात. त्यातून नाडी भविष्याबाबतची प्राथमिक माहिती वाचून ते स्वतः किंवा अन्य कोणासाठी पहायचे असेल तर कुठल्या जवळच्या केंद्रात जाऊन पहावे त्यांचे पत्ते फोन क्र. वगैरे महत्वाच्या माहितीचे मार्गदर्शन काही फी घेऊन केले जाते. या शिवाय At A Glance - Shashikant Oak ही वेबसाईट shashioak.weebly.com लिहून आणि दुसरी वेबसाईट At A Glance - Shashikant Oak 1 साठी shashioak1.weebly.com असे लिहून डाऊनलोड करता येतील. या वेबसाईटमधून नाडी ग्रंथांवर आधारित मराठी हिन्दी आणि इंग्रजीतील ब्लॉगमधून या विषयाची ओळख करून दिली जाते. याशिवाय नुकतीच आणखी एक सुविधा उपलब्ध करून दिली गेली आहे. त्या अनुसार ५० रुपये **SBI Savings Ac. 11099835376 , Shashikant Oak** या नावाने,(**IFSC No-SBIN0000454**) जमा करून ९६५७०८६९५७ या मोबाईल क्रमांकावर आपल्या गाव, राज्य, मोठाल्या शहरातील उपनगरे किंवा पेठा कळवाव्यात आपल्याला आसपासच्या भागातील ३ नाडी केंद्रांचे पत्ते फोन नंबर उपलब्ध करून दिले जातील.

**दि १७ ऑगस्ट २०१६**

**महाराष्ट्रातील नाडी केंद्रांचे पत्ते कसे मिळवता येतील?**

**मित्रहो, आपल्याला हव्या त्या भागातील ३ नाडीकेंद्रांचे पत्ते पाठवण्यात येतील.**

**अधिक माहितीसाठी आपण ९८८१९०१०४९ वर संपर्क करावा.**

# अनुक्रमणिका


१. नॉस्ट्रॅडेमसपेक्षा अदभूत नाडी ग्रंथ भविष्य !

२. चला नवग्रह मंदिरांच्या यात्रेला

३. नवग्रह यात्रेची आखणी अशी करता येईल

४. दक्षिणेची ही श्रद्धापूर्ण सफर कशासाठी ?

५. तमिळनाडू मधील आणखी काही वैशिष्ठ्यपूर्ण मंदिरे

६. नाडी ग्रंथ प्रश्नोत्तरी

७. नाडीग्रंथ प्रकार

८. नाडी ग्रंथांचा इतिहास

९. काटेबारसच्या नवनाथ कुंभार यांची ओळख आणि त्यांचे अदभूत अनुभव

१०. नाडी ग्रंथ भविष्यातील उपाय व तोडगे.

११. नाडी ग्रंथ प्रेमींचे अदभूत अनुभव

१२. हा घ्या चमत्काराचा पुरावा!

१३. नाडी ग्रंथ पट्टी मिळणे ही किती अशक्यप्राय गोष्ट आहे ?

१४. तुम्हीच तुमचे नाडी भविष्य लिहा!

१५. नाडिग्रंथांतील जन्मदिनांकाची नोंद – एक अभ्यास लेखक :– हैयो हैयैयो

१६. लाल निळ्या रंगाचा इंगा!

१७. आपणाकडून माहिती काढून तीच आपणाला प्राचीन ताडपट्टीतून सांगत असल्याचा बहाणा करण्यात येतो. – या संशयाचे निराकरण

१८. नाडीग्रंथ ताडपट्टीच्या त्या फोटोचे इतके महत्व ते काय ?

१९. महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती ही एक सर्कस आहे... इति – बोध अंधश्रद्धेचा...

२०. नाडीग्रंथ भविष्य आणि नवग्रह शांती अर्थात कर्ममहात्म लेखक – प्रा अद्वयानंद गळतगे

२१. तेरा काम हो जाएगा

२२. नाडी केंद्रांतून आणखी चांगली सेवा कशी मिळू शकेल ?

२३. पूज्य रमणी गुरुजींचे पुण्यात जीवनाडी कथन :

# १. नॉस्ट्रॅडेमसपेक्षा अदभूत नाडी ग्रंथ भविष्य !

वरील शीर्षक वाचून वाचकांचे असे मत होण्याचा संभव आहे की आत्तापर्यंत नॉस्ट्रॅडेमस हा भविष्यवेत्ता जागतिक घडामोडींचे भाकित करणारा जगातील नंबर १ चा म्हणून गणला जातो, त्यापेक्षा जास्त अदभूत भविष्य कथन नाडी ग्रंथात येते असे म्हणणे अतिशयोक्ती असणार! अन्यथा ते कसे शक्य आहे ? विंग कमांडर ओकांचा नाडी ग्रंथ भविष्याशी परिचय झाल्यापासून ते नाडी ग्रंथांच्या अदभूततेचा डांगोरा पिटतात, म्हणून काय नॉस्ट्रॅडेमससारख्या विश्वविख्यात भविष्यवेत्त्याला नाडी महर्षींच्या ग्रंथांच्या संदर्भात दुय्यम स्थान देऊन त्याच्या गौरवाला कमी लेखण्याचा उपद्व्याप ओकांनी करावा?

मी नाडी ग्रंथ प्रेमी असल्याने नाडी भविष्यकर्त्यांची जास्त तारीफ करतोय कि खरोखरीच तशी परिस्थिती आहे हे या लेखाच्या वाचनांनी तूलनात्मक अभ्यास करून ठरवावे. तूलना करताना नॉस्ट्रॅडेमसला किंवा अन्य ज्योतिषांना कमी लेखण्याचा माझा हेतू नाही. त्यांची भाकिते करण्याची पद्धत वेगळी असू शकते.

दिनांक ११ सप्टेंबर २००१ हा मानवतेच्या इतिहासातील एक अविस्मरणीय दिवस होता. त्या दिवशी न्यूयॉर्क शहरातील वर्ड ट्रेडसेंटर या ११० मजली जुळ्या टॉवर्सवर विमानाने हल्ला चढवून अतिरेक्यांनी अमेरिकेचे नाक कापले. सुसंकृत समाजाला आतंकवादी कारवायाकरून वेठीला धरता येते व हवा

तो राजकीय किंवा अर्थिक, धार्मिक, सामाजिक निर्णय पदरात पाडून घेता येतो या त्यांच्या विचारसरणीचा तो अत्युच्च बिंदू होता. सुसंस्कृत समाजाच्या सहनशीलतेलाही सीमा बंधने असतात. ती तोडली तर दहशतवाद्यांच्या विरुद्ध युद्ध पुकारावे लागते. ही वस्तूस्थिती त्या दिवशीच्या घटनेमुळे जगातील सर्व राष्ट्रांच्या पुढे आली. आणि त्यामुळे दहशतवादाविरुद्ध युद्धाला २१ व्या शतकाच्या सुरवातील तोंड फुटले. साहजिकच या महत्त्वाच्या घटनेचे नॉस्ट्रॅडेमसने वर्णन कसे केलेले असेल हा कूतुहलाचा आणि चर्चेचा विषय होता. त्याप्रमाणे पुढील १-२ दिवसात 'सेंचुरीज' या नॉस्ट्रॅडेमसने लिहिलेल्या ग्रंथातील श्लोकांची अवतरणे देऊन उद्वस्त टॉवर्सच्या घटनेचा व श्लोकातील वर्णनाचा अर्थ कसा तंतोतंत जुळतो याचे रसभरित वर्णन जवळजवळ सर्व प्रसिद्धी माध्यामातून प्रसिद्ध केले गेले. ग्रहांकितच्या २००१च्या दिवाळी अंकातून या विषयावरील विस्तृत लेखात ते वर्णन सविस्तरपणे दिलेले आहे. असा तऱ्हेने जवळजवळ ४०० वर्षांपुर्वी लिहिलेल्या घटनांचे भविष्य कथन सत्य ठरल्याचे मान्य केले गेले आणि आत्ता पर्यंत अचुक ठरलेल्या भाकितांच्या कडीत आणखी एका महत्वाच्या भाकिताची भर पडली असे म्हटले गेले.

अशा या जगतमान्य भविष्यवेत्त्याची बरोबरी, नव्हे त्याला मागे सारून नाडी ग्रंथकर्त्या महर्षींना त्याच्या पेक्षा जास्त पॉवरबाज व प्रतिभावान ठरवणे म्हणजे भारतीय प्राचीन संस्कृतीचे गुणगान करून आपली पाठ आपण थोपटण्याचा प्रकार असावा असा संशय ज्योतिषशास्त्र विरोधकांना येणार!

त्यांच्या अशा संशयाचा भ्रमनिरास पुढील तूलनेतून होणार आहे. त्या आधी मी ज्या नॉस्ट्रॅडेमसची तूलना अनेक प्राचीन ऋषी-मुनींनी निर्माण केलेल्या

नाडी ग्रंथांशी केलेली आहे. त्यांच्या कार्याचा व नॉस्ट्रॅडेमसचा संक्षिप्त परिचय करून देणे उचित होईल.

**नाडीग्रंथ भविष्याचा संक्षिप्त परिचय**

प्राचीन काळापासून भारतात असे कित्येक ऋषी-मुनी झाले की ज्यांना आपण आदराने महर्षी म्हणतो. रामायण, महाभारत, भागवत आदि ग्रंथांतून ज्याचा आदरपूर्वक उल्लेख येतो, असे अगस्त्य, वसिष्ठ, विश्वामित्र, भृगू, शुक्र, नारद, काक भृशुंडी व अशा अनेक महर्षींनी हजारो वर्षांपासून आपल्या आत्मज्ञानाच्या बळावर लाखो-करोडो लोकांच्या जीवनाचे चित्रपट पाहून त्यांचे भविष्य विविध भाषात, काळात, स्थळात, तयार करून योग्य वेळ येताच त्या विशिष्ठ व्यक्तीला अचूकपणे पाहायला, वाचायला, हाताळायला, मिळावे यासाठी तयार ठेवलेले आहे. सध्या तमिळनाडू राज्यात अनेक ठिकाणी तमिळ लिपीत श्लोकबद्ध केलेले हे भविष्य कथन आपण जी नीरा पितो त्या ताडाच्या झाडाच्या झावळ्यांच्या पानांवर कोरून लिहिलेली पहायला मिळते. त्यांना नाडी भविष्य ग्रंथ असे म्हणतात. साधारण एक व्यक्ती एक पट्टी असे ते असून त्या पट्टीत जातकाचे नाव, त्याच्या शिवाय त्याच्या आई-वडिलांचे, पती/पत्नीचे नाव, तमिळ पंचांगाप्रमाणे जन्म दिनांक, वार, वर्ष, जन्मकाळची ग्रह-नक्षत्र, राशीची स्थिती, त्याचा नोकरी-धंदा, शिक्षण आदिचे अचूक उल्लेख येतात. हे सर्व स्त्री असेल तर डाव्या व पुरूष असेल तर उजव्या हाताच्या अंगठ्याच्या ठशाच्या मदतीने हुडकले जाते. या शिवाय भावी काळातील महत्त्वाच्या घटनांचे, त्या मधून सुटका होणे किंवा त्याची तीव्रता कमी करण्यासाठी काही दैवी उपाय सुचवले जातात. सर्वसामान्य व्यक्तिचे जीवन सुखी व्हावे यासाठी परोपकार भावनेतून हे ग्रंथ लिहिले गेले आहेत.

**नॉस्ट्रॅडेमसचा संक्षिप्त परिचय**

नॉस्ट्रॅडेमसचे पूर्ण नाव मिशेल किंवा मायकल द नॉस्ट्रॅडेमस असे होते. फ्रांन्स मधील सेंट रेमी या खेड्यात जन्मलेले नॉस्ट्रॅडेमस हे आपल्या वडिलांच्या चार मुलांपैकी थोरले होते. वैद्यक शास्त्राचा अभ्यास करून त्यांनी त्या काळी उद्भवलेल्या प्लेगच्या साथीत अनेक लोकंचे जीव वाचवले. परंतु आपल्या पत्नीला व मुलांना ते वाचवू शकले नाहीत. म्हणून निराश होऊन युरोपच्या अन्य भागात स्थलांतर केले. त्या नंतर त्यांची भविष्य जाणण्याची रुची वाढली. काही वर्षे एकांतवासात काढल्यावर नॉस्ट्रॅडेमसना दृष्टांत होऊ लागले. ‘मला भविष्य काळातील घटना दिसतात’ असे म्हणायला लागले. सुरवातीला त्यांच्या म्हणण्याकडे कोणी लक्ष देत नसे. परंतु एकदा रस्त्यातून जाताना एका साधारण गावकऱ्याला थांबवून त्यांनी लवून अभिवादन केले त्यांना त्यावेळी ‘हिज होलीनेस’ म्हणून केलेले भविष्य कथन एकोणीस वर्षानंतर तीच व्यक्ती सन १५८५ मधे व्हेटिकन मधील ‘महामहीम पोप सिक्स्थ’ म्हणून नावारूपाला आली. तो पर्यंत त्यांची ख्याती एक महान भविष्यवेत्ता म्हणून झाली होती. त्यांच्या वाढत चाललेल्या कीर्तीची ईर्षा करून समकालीन डॉक्टर्स, राजकीय पुढारी, अन्य भविष्य वेत्त्यांनी केलेल्या दुष्ट कारवायांना त्यांना तोंड द्यावे लागले. दृष्टांतात समजून येणाऱ्या घटनांची नोंद करून त्यांना श्लोकबद्ध करण्याचे काम त्यांनी सुरू केले. काही घटना तात्कालीन होणार असल्याने ज्यांच्या विरोधात त्या होत्या ते, नॉस्ट्रॅडेमसचा वैर भाव करू

लागले. प्रकरण जिवावर बेतते आहे, हे पाहून त्यांनी आपल्या ग्रंथाची रचना गूढ रीतीने करायचे ठरवले. चार ओळींच्या फ्रेंच भाषेत केलेल्या रचना नुसत्या वाचून काहीच अर्थवाही होत नाहीत असे भासवून त्यांनी आपला जीव वाचवला. त्यामुळे त्यांच्या काव्यातील देशांचे, शहरांचे, लोकांच्या नावाचे उल्लेख प्रतीकात्मक, गूढ व घोटाळ्यात टाकणारे केले गेले. 'सेंचुरीज ' ग्रंथात दहा अध्याय आहेत. प्रत्येत अध्यायात शंभर श्लोक आहेत. सन ३९९७ पर्यंत च्या घटनांचा उल्लेख त्यात केला गेला आहे. आतापर्यंत त्यांनी केलेली शेकडो भविष्य कथने खरी ठरल्याचे दावे केले जातात. सेंचुरीज ग्रंथाचे आत्ता पर्यंत जवळ जवळ सर्व भाषात अनुवाद प्रसिद्ध झालेत. त्यांनी केलेल्या कथनांच्या पुस्तकांची विक्री अफाट असते. तो पैसे मिळवायचा धंदा झाल्याने त्याच्या अनुवादात त्या भाषेतील वाचकांना रुचतील असे अर्थ घुसडले जाऊ लागले. सध्या इंटरनेटवरून अव्वाच्या सव्वा दावे करण्याची स्पर्धा चालू आहे. नॉस्ट्रॅडेमसला न मानणारे लोक असंख्य आहेत. त्यांचा असा दावा असतो की कित्येक श्लोकांचा मनमानी अर्थ तयार करून शब्दांच्या तोडफोडीची मखलाशी करून वाचकांच्या आवडीनिवडी लक्षात घेऊन अर्थामधे बदल केले जातात, त्यांमुळे एकाच श्लोकाचे अनेक अर्थ पाहायला मिळतात. नॉस्ट्रॅडेमस यांच्या भविष्य कथनांवर महत्वाचा आणखी एक आरोप असा की कुठली एखादी घटना घडून गेल्यावर त्या संदर्भास जुळतील असे श्लोक हुडकून त्यातील वर्णन ओढून ताणून फिट्ट बसवण्याचे प्रयत्न केले जातात. असे असले तरी अनेक लोक या भविष्य कथनांना रोमांचकारी अनुभव मानून मनोरंजनाच्या रूपात खरे मानतात.





**डॉ. विजय भटकर म्हणतात...**

नाडीपट्टीत येणारी माहिती आज पासून दहा वर्षांनी प्रगत कॉम्प्युटरला एकावर अठरा शून्ये इतके गणिते करून ही ती माहिती सांगता येणार नाहीत. कॉम्प्युटरच्या भाषेत त्याला 'एन पी कम्प्लीट' प्रॉब्लेम मानतात.



**श्री. चंद्रकांत दादा व सौ पुष्पलता शेवाळे आपल्या विस्तृत मुलाखतीत नाडीग्रंथांचे अनुभव सांगताना म्हणतात –**

भंग वस्तूंचा व्यापार कराल. मुलीच्या विवाहासाठी नाडी पाहिली . शांती दीक्षा केली.आणि सुयोग्य जावई मिळाला.

# २. चला नवग्रह मंदिरांच्या यात्रेला

**सूर्यस्थान** – सूर्यनार कोईल
(कुंभकोणम पासून १५ कि.मी. दूर)

**महर्षी व्यास कृत सूर्य ग्रहस्तोत्र**

**जपाकुसुम संकाशं काश्यपेय महाद्युतिम् ।**
**तमोरीं सर्व पापघ्नम् प्रणतोस्मि दिवाकरम् ।।**

**अर्थ – ज्यामुळे तळपत्या दिवसाची सुरवात होते अशा सूर्याला माझा नमस्कार असो. काश्यप महर्षींच्या पुत्रा, तुझ्यामुळे अज्ञान तिमिराचा व सर्व पापांचा विनाश घडो.**

**आदित्य गायत्री –**

**ओंम अश्वध्वजाय विद्महे पाशहस्ताय धीमहि**
**तन्नो सूर्यः प्रचोदयात।**

**कथा –** सात घोड्यावर आरूढ (प्रकाश किरणांच्या सप्तरंगांना एकत्र करून) एका चाकाच्या (एका पांढऱ्या रंगाच्या रूपाने) रथावर आरूढ होऊन काश्यप पुत्र सूर्य, देव – दानवांना समानपणे प्रकाश व ऊष्णता देऊन जीवन प्रदान करतो. सूर्याच्या रथाचे सारथ्य अरूण करतो. सूर्याच्या प्रकाशाची व अति ऊष्णतेची विनाशक तीव्रता अरुण नियंत्रित करतो असे मानले जाते. सूर्याच्या उषा व छाया या दोन अर्धांगिनी असून, लाल कमल हे त्याचे आवडते पुष्प आहे. वाहन मोराचा रथ आहे. रंग – लाल सर पिवळा अग्नितत्वाच्या या देवाची रास सिंह आहे.

**मंदिराची रचना** – हे मंदीर कावेरी नदीच्या तीरावर वसलेल्या कुंभमेळ्यच्या तोडीचे पावित्र्य असलेल्या कुंभकोणम जवळ आहे. छोटेसे पण टुमदार मंदीर पश्चिम मुखी आहे. या मंदिराचे आणखी वैशिष्ठ्य म्हणजे अन्य नवग्रह मंदिरात शिवाच्या पिंडीला मध्यवर्ती स्थान दिलेले असते. तसे न होता, तेथे सूर्य हाच 'मूलावर' – मुख्य मूर्ती म्हणून स्थापित केला गेला आहे.

प्रवेश द्वारावरील राज गोपुरम् तीन मजली असून त्याला पाच कळस आहेत. सूर्य देवतेची मूर्ती उभी असून, मंदिरचा आकार रथासारखा आहे. मंदिरात सूर्यदेवा समोर गुरू – बृहस्पतीची मूर्ती आहे. या भागाला गुरू मंडप म्हणतात. त्याच्या पूर्व दिशेला सभानायक मंडपम् असून तेथे नवग्रहांच्या मूर्ती आहेत. या भागात दगडी घोडा आहे. तो सूर्याच्या सात घोड्यांचे प्रतीक आहे. या परिसरात अन्य आठ ग्रहांची छोटी मंदिरे आहेत. प्रत्येकाला प्रदक्षिणा घालण्यासाठी वाट आहे. या सर्व ग्रहदेवता शस्त्रधारी नाहीत. शुभेच्छादर्शक 'अंगुली मुद्रेत' किंवा 'अभयहस्त' मुद्रेत आहेत.

**मंदिराचा इतिहास –** हे मंदिर या स्वरूपात निर्माण करण्याचे श्रेय चोल राजा (इ.स. १०७० – ११२२) याला जाते. मात्र मान्यताप्राप्त कवी इलंगो यांच्या 'शिलप्पडीकरम' या महाकाव्यतील कावेरीच्या त्रिभुज प्रदेशातील सूर्यमंदिराचा उल्लेख असे दर्शवतो की ११ व्या शतकात चोल राजा – 'कुलोत्तुंग' याने त्या पूर्वीच्या अति प्राचीन मंदिराचा जीर्णोद्धार केला असावा. त्यामुळे १३ व्या शतकातील ओरिसा राज्यातील कोणार्क सूर्य मंदिरापेक्षा हे मंदीर नक्कीच पुरातन आहे.

**मंदिरातील उत्सव –** पोंगल (मकर संक्रांती नंतर) रथ सप्तमी हा महत्वाचा सण. तो जर रविवारी रोहिणी नक्षत्रात असेल तर विशेष पवित्र मानला जातो. वेलरुक्कु या वृक्षाला तेथे पवित्र मानले जाते. आपण मागितलेली इच्छा पूर्ण झाली तर आभार प्रदर्शक वस्त्रे वृक्षाला बांधण्याचा प्रघात आहे. या वृक्षाची दोन पाने खाऊन येथील कुंडात स्नान करणे शुभ मानतात.

नाड़ी ग्रंथ भविष्यात सामान्यतः सूर्यमंदिरात प्रथम पूजा करावी लागते. तेथे विनायक व नवग्रहांची पूजा करून प्रदक्षिणा करणे अपेक्षित आहे. शक्यतो पहाटे मंदिर कचेरीत परवडेल अशा किंमतची पूजा तिकिटे फाडून अर्चना करत येते. साधारण २ ते ३ तास लागतात. बाहेर काशायवस्त्रात काही साधू अन्नदानासाठी मिळतात. ते ही काम उरकता येते. नाड़ी ग्रंथाप्रमाणे शांति-दीक्षा करणाऱ्यांनी या मंदिरात नव ग्रहांच्या पूजेसाठी आवर्जून जावे.

**कंडीयूरचे सूर्यमंदीर –** कुंभकोणम पासून २२ कि. मी. वर आणखी एक सूर्य मंदिर प्रसिद्ध आहे. शिवांनी तेथे सूर्योपासना केल होती अशी मान्यता आहे. सातव्या शतकातील ज्ञान संबंधर व तिरु नवक्करसू या कवींच्या काव्यातून या मंदिराचे उल्लेख मिळतात. या मंदिरात शिवागम प्रतिष्ठा नावाची मूर्ती रचना आहे. त्यात सूर्य मधे व उरलेले आठ ग्रह आठ दिशांना असे मांडले आहेत.

नैवेद्यम् – शक्करई पोंगल

गूळ किंवा साखरेचा मूग घालून केलेला भात.

चंद्र स्थान – तिंगलूर

(कुंभकोणम पासून २२ कि.मी. दूर)

महर्षी व्यास कृत चंद्रग्रह स्तोत्र

**दधिशंख तुषाराभं क्षीरोदार्णव संभवम् ।**

**नमामि शशिनं सोम शंभोर्मुकुट भूषणम् ।।**

अर्थ – क्षीरसागरातून उत्पन्न, अतिशुभ्र असा जो चंद्र सदैव शिवांच्या मस्तकावर विराजमान असतो त्याला माझा नमस्कार असो.

**आदित्य गायत्री –**

**ओंम पद्मध्वजाय विद्महे हेमरुपाय धीमहि**

**तन्नो सोमः प्रचोदयात।**

तमिळ भाषेत तिंगल म्हणजे चंद्र व ऊर म्हणून तिंगलूर याचा अर्थ चंद्राचे गाव. असे हे चंद्राचे गाव कावेरी नदीच्या काठाने जाणाऱ्या रस्त्यावर आहे. वाटेत हिरव्यागार भात शेतीची डौलदार पेरणी दिसते. खळखळणारे कालव्याचे पाणी, केळीच्या बागा, नारळाची बने यामुळे हा परिसर अत्यंत रमणीय आहे.

मंदिरांचा मुख्य भाग टुमदार आहे. शिवकैलास नाथर व पेरीयनायकी पार्वतीच्या रूपात येथे दिसतात. आजूबाजूला सूर्य नारायण आपल्या उषा व छाया नामक पत्नींच्या समावेत असून विनायक, कार्तिकेय आदींच्या मूर्तीही तेथे आहेत. येथे शिव दक्षिणमूर्ती या रूपात असून एका हातात ताडपत्राचे पुस्तक, दुसऱ्या हाताची बोटे गालशी टेकवून चिंतनशील मुद्रेत पद्मासनात बसलेले आहेत. म्हणून त्यांना शिवयोगी म्हणतात. अशा शिवांच्या पायाशी मुयालागण या उद्दामपणा व अज्ञानाचे प्रतीक असलेल्या विरोधकांचा पायांनी तुडवून बंदोबस्त केल्याचे ते प्रतीक आहे. साधारण ७व्या शतकत या मंदिराचा पुनरुद्धार झाला असावा असे मानण्यात येतो.

या शिवाय तिरु देवेंकाडू नावाचे आणखी एक मंदीर चंद्र देवतेसाठी प्रसिद्ध आहे. कुंभकोणम पासून ऊडार वडी येथून जवळ कावेरी नदीच्या किनारी या मंदिरात कर्काटकेश्वर जेथे खेकडा शिवपिंडीला फुले वाहून पूजा करत आहे अशी मूर्ती आहे. अपूर्वनायकी

ही याची सहचारिणी आहे. या मंदिराला नंदाल उर्फ खेकडा मंदीर ही म्हणतात. हिरव्यागार पाचूच्या समान भातशेताच्या मधून जाणारा रस्ता थेट मंदिरापाशी पोचतो.

या मंदिरात कर्क दोष किंवा चंद्र दोषासाठी प्रार्थना व पूजा केली जाते. या मंदिरात चंद् बसलेल्या अवस्थेत असून त्यातून तो शिवांच्या इतकाच ताकतीचा आहे असे दर्शवले आहे. अन्य ग्रहांच्या मंदिरातील मूर्ती सामान्यतः उभ्या असतात.

नैवेद्यम् - दहीर सादम् (उच्चार दईरसदम)

दही घालून कालवलेला भात, वर चरचरीत फोडणी - त्यात चवीला कैरी व अन्य मौसमी फळांच्या छोट्या फोडी टाकून रुचकर बनवलेला पदार्थ.

**मंगळस्थान –** वैदीश्वरन कोईल

(कुंभकोणम पासून ५० कि.मी. दूर नाड़ी ग्रंथ भविष्यासाठी सुप्रसिद्ध गाव)

महर्षी व्यास कृत मंगळ उर्फ सेव्वाय ग्रहस्तोत्र

**धरणी गर्भ संभूतम विद्युत कांति समप्रभम् ।**
**कुमारं शक्ति हस्तं तं मंगलम् प्रणमाम्यहम् ।।**

अर्थ - शक्ती स्वरूप विद्युत हाती घेतलेल्या व अति शुभ्र कांतीच्या धरणी - पृथ्वी पुत्राला माझा नमस्कार असो.

**अंगारक गायत्री –**

**ओंम वीरध्वजाय विद्महे विघ्नहस्ताय धीमहि**
**तन्नो भौमः प्रचोदयात।**

सर्व ग्रहात तप्त लाल रंगाचा, लाल पोषाख, रक्त वर्णीय फुलांचा चाहता मंगल किंवा भौम - भूमिपुत्र आपल्या उग्र तेजाने तळपून जनामधे भीतीयुक्त आदर निर्माण करणाऱ्या या ग्रहाचे हे मंदीर आहे. वैदीश्वरन कोईल या मंदिरात शिवाच्या शिवाय औषधांचा अधिपती वैद्यनाथ - तैय्यल नायकी या औषधी तेलासाठी प्रसिद्ध आहे. पूर्वेला भैरव, पश्चिमेला वीरभद्र, उत्तरेला काली व दक्षिणेला कर्पगविनायक व दुर्गादेवी यांची उपमंदिरे आहेत.

मंगळाची मूर्ती मेंढ्यावर स्वार, एका हातात गदा, आठ घोड्यांचा सुवर्ण रथावर आरूढ मंगळ ग्रहाला, अंगारक, कूजा, शक्तीधरा, लोहिता, रक्तवर्णा आदि नावे तमिळ लोकात प्रसिद्ध आहेत. मंगळदशेचा प्रभाव तीव्रयुद्धजन्य परिस्थिती निर्माण करणारा आहे. सेनादलात किंवा औषध देण्याच्या कामी चाकरी करणाऱ्या लोकांच्या कुंडलीत मंगळाचे स्थान प्रभावी असते. सेल्व मुत्थुकुमार स्वामीचे येथील मंदीरही मंगळ ग्रहाप्रमाणे या शिवमंदिरात प्रमुख आहे.

वैदीश्वरन कोईल हे गाव नाड़ी ग्रंथ भविष्यासाठी प्रसिद्ध पावले आहे. (वैद्यरूपातील शिव त्यांचे कोईल म्हणजे - मंदीर) नाडी ग्रंथाच्या ताडपट्ट्यांचा साठा या मंदिरात फार पूर्वी पासून होता. भविष्य कोरलेल्या ताडपट्ट्यांचे प्रचंड साठे या मंदिरात जतन केले जात असत. मंदिराच्या तळघरात मोठ्या मोठ्या लाकडी पेट्यात ताडपट्ट्यांचे साठे आहेत असे सांगणारे वृद्ध येथे भेटतात. शिवाय या मंदिराच्या तीन बाजूंनी लहानमोठी दुकाने थाटून आपल्या जवळील पट्टयांवरून भविष्यकथन करण्याचा व्यवसाय मोठ्या प्रमाणात चालतो. शांती-दीक्षा कांडात वर्णन केलेल्या पूजा व जपसाधना याठिकाणी केल्या जातात. मात्र याचा गवगवा फार केला जात नाही.

**इतिहास –** साधारण एक हजार वर्षांपेक्षा प्राचीन या मंदिराच्या भव्यतेत वेळोवेळी भर घालून वाढ केल्याचे तेथील वास्तुकलेवरून लक्षात येते. उतरत्या श्रेणीने कलाकुसर केलेल्या भिंती व स्तंभ नंतरच्या काळातील

वाढवलेल्या भागांतील ओबडधोबड शिल्पातील कारागिरी उपदेवतांच्या व मंडपातील मंदिरातून स्पष्ट जाणवते. येथे नीम व वेलइरुक्कू नावाच्या पानांची महती फार सांगतात. मिरीचे काळे दाणे व मीठ यांची आहूती प्रसिद्ध आहे. येथील जटायू कुंडममध्ये रामायणातील जटायू व संपातीच्या मृत्यूची कथा प्रमुख आहे.

येथील एका बाह्य मंडपात तंजावूरच्या राजाची व प्रधानाची मूर्ती खांबात कोरली आहे. त्या मुळे त्यांच्या प्रेरणेने मंदिराच्या विस्ताराचे व नाडी ग्रंथपट्ट्यांच्या पुनर्लेखनाचे काम हाती घेतले असल्याची खात्री पटते. ज्यांना मंगळ ग्रहाची पीडा आहे, ज्यांना संधीवाताचे दुखणे आहे, पोटाचे विकार आहेत त्यांचे इलाज येथील पूजा, औषधी तेलाच्यामर्दनाने केले जातात. नाडी भविष्य पाहायच्या नादात या मंदिराला वेळ काढून भेट देणे जमत नाही. या सबबीमुळे मंगळाचा प्रभाव जीवनात जाणवला की या मंदिराच्या भेटीची धावाधाव करावी लागते.

**नैवेद्यम् – तुवरम् परच्चु सादम्**

तुरीच्या डाळीसह बनवलेला तिखटसर सरबरीत भात. त्याला ठसकेबाज तडका असा हा बेत असतो.

**बुध स्थान –** तिरुवेंकाडू

(कावेरी नदीच्या तीरावर वैदीश्वरन कोईल पासून ११ कि.मी. दूर सर्वात प्राचीन ३ हजार वर्षापूर्वीचे काही भाग या मंदिरात आहेत. पूमपुहार या बंदरापाशी कावेरी नदी समुद्राला मिळते त्या वाटेवरील हे मंदीर रचनेने छोटेसे आहे.)

महर्षी व्यास कृत बुध ग्रहस्तोत्र

**प्रियंगु कलिला शामं रूपेण प्रतितम् बुधम् ।**
**सौम्यं सौम् गुणोपेतम् तं बुधम् प्रणमाम्यहम्।।**

अर्थ – अप्रतीम रूप, वर्णाने सावळा, सौम्य व शांत स्वभाव असणाऱ्या बुधाला माझे वंदन असो.

**बुध गायत्री –**

**ओंम गजध्वजाय विद्महे सुगहस्ताय धीमहि**
**तन्नो बुधः प्रचोदयात।**

तमिळमधे तिरू म्हणजे संस्कृत मधील श्री. वेन – श्वेत, काडू – अरण्य म्हणजे श्वेत वृक्षांचे अरण्य असलेला वन प्रदेश. बुध चंद्राचा पुत्र व पुरूरव्याचा पिता. चंद्रवंशीय प्रजेचा जनक. हिरव्या अंगरख्याने युक्त अश्वारूढ बुधाच्या तीन हातात तलवारी व एका हातात गदा ही अस्त्रे आहे. बुधाचे मंदीर तसे लहान व थोडेसे आत असल्याने व त्या मंदिरात अनेक उपदेवतांमुळे नाडीपट्टीत सांगितलेल्या योग्य देवतेची पूजा करण्याआधी खात्री करावी. भाषेच्या अडचणीमुळे कधी कधी अपसमज होऊ शकतो. शिवांनी मरुतवाहन राक्षसाचा नाश करण्यासाठी अघोररूप धारण केले. त्या अघोरमूर्तीचे दर्शन येथे होते. त्यांचे ते रूप पाहाताना थरकाप होतो. या युद्धात नंदीच्या शरीराला नऊ ठिकाणी जखमा झाल्या. ते दर्शवणारी त्याची मूर्ती येथे आहे. शिवाय सूर्य, चंद्र व अग्नीतीर्थ हे तलाव पाहायला मिळतात. य़ेथील वृक्ष वनकंदल असून जवळच आदि चिदंबरम् मंदिराप्रमाणे हस्तिनटनम् या नृत्यप्रकारात शिवांचे दर्शन होते. माघमासात १२ दिवसांचा उत्सव साजरा केला जातो.

**नैवेद्यम् – शुंडल**

हिव्यामुगा समावेत भाताच्या खिचडीला मोहरी व कढीपत्याची फोडणी. वर नारळाच्या किसाची पखरण.

**गुरू स्थान – अलंगुडी**

(कुंभकोणम पासून १७ कि.मी. दूर कावेरी नदीच्या दक्षिण तीरावर)

**महर्षी व्यास कृत गुरू ग्रहस्तोत्र**

**देवानां च ऋषिणां च गुरू कांचन संन्निभम् ।**
**बुद्धिभूत त्रिलोकेशम् तं नमामि बृहस्पतिम् ।।**

अर्थ – हे बृहस्पते, सुवर्णाप्रमाणे तळपत्या देव अणि ऋषी वृंदाच्या पुरोहित गुरूंना माझे नमन असो.

**गुरू गायत्री –**

**ओंम वृषभध्वजाय विद्महे गृणिहस्ताय धीमहि**
**तन्नो गुरूः प्रचोदयात।**

वाचस्पती किंवा बृहस्पती ग्रह सर्व ग्रहात प्रेमळ व दयावान मानला जातो. त्याचे अलंगुडी मंदिरात महत्वाचे स्थान आहे.(अलन म्हणजे हलन, विष, हल व गुडी म्हणजे धारण, प्राशन करणारा अशी या गावाच्या मंदिराच्या नावाची फोड करता आढळून येते) देव आणि दानवांच्या प्रयत्नाने समुद्र मंथनातून निर्माण झालेल्या विषाचा परिणाम नष्ट करण्यासाठी भगवान शंकरांनी ते हलाहल पिऊन टाकले व त्या संकटातून पृथ्वीवरील मानवासह जीवसृष्टीला वाचवले. म्हणून या ठिकाणच्या शिवांच्या मूर्तीला अबत सहायर(अबत – आफत, संकट, सहायर – मदत करणारा) असेही म्हटले जाते.

या स्थानाला गुरूक्षेत्र मानतात. पंचारण्यम् या नावाने हा भाग पूर्वी प्रसिद्ध होता. हिरवीगार भात शेते, कमळाच्या लिलीच्या फुलांनी बहरलेले तलाव, यामुळे या परिसरात प्रसन्न वातावरण आढळते.

पाच मजली नक्षीदार गोपुरम असलेले विस्तीर्ण आकाराच्या मंदीराला बाहेरील तटबंदी व खंदकाने आणखी बळकटी मिळते. हे मंदीर कमीतकमी १४०० वर्षे जुने असावे असे मानले जाते. मंदीर प्रदक्षिणा मार्गावर विनायक, सूर्य, शनिश्वर, नटराज, शुक्र, अगस्त्य व पार्वती अम्मन यांची उपमंदिरे आहेत. या ठिकाणी दीप लाऊन अर्चना करतात. कोणी आपल्या वयाच्या इतक्या तर कोणी २४ प्रदक्षिणेच्या रूपाने दीप लावतात. पिवळी वस्त्रे, मातीच्या पणत्या, त्यात तेलाची वात शिवाय काड्यांची पेटी साहित्य तत्परतेने मिळते.त्यामुळे दीप लावण्यासाठी उत्साह वाटतो.

गुरू ग्रहाच्या मूर्तीची पूजा करताना अगस्त्य, विनायक आदी देवांच्या पूजेची सोय त्यातच होते. अगस्त्य महर्षींच्या बुटक्या व स्थूल पोटाच्या आकारावरून त्यांची मूर्ती पटकन ओळखता येते.चैत्र पौर्णिमा, पुष्य नक्षत्रावरील पौष व उत्तरा फाल्गुनी नक्षत्रावर फाल्गुन महिन्यात मोठा उत्सव सादरा केला जातो.

**तिरुतेनकुडी –** तंजावूर पासून पाच कि.मी. दूर येथील मंदिरात गुरूंची पूजा करतात. काळ्याकभिन्न दगडात बांधलेल्या मंदिराचे आकर्षण असे की तेथील चंद्रकांत नामक एक दगड. वातावरणातील बाष्प शोषून तो ओला राहतो. येथील शिवाच्या मुर्तीच्या मस्तकावर या चंद्रकांत पाषाणातून, जलाभिषेक नैसर्गिकरित्या सदैव होत असतात. विस्तीर्ण जलाशयाजवळ, शिवाला स्वयम् देवर नावाने येथे पूजले जाते. सुंदर कुंडल अंबिकई या नावाने पार्वतीला सन्मान दिला जातो. गुरू पेयारची या नावाचे गूरू ग्रहाचे एक प्रसिद्ध उपमंदीर आहे. विनायक, कार्तिकेय, नटराज, गजलक्ष्मी आदि मंदिरे याच मंदिर परिसरातील महत्वाची उपमंदिरे आहेत. तट्टई म्हणजे बेट, वन्नारू व वेट्टारू नद्यांच्या मधे वसलेल्या रथपुरी उर्फ तेरूर असे म्हणतात.

**नैवैद्य् –** हरभऱ्याच्या भिजवून फुगवल्याल्या डाळीला फोडणी दिलेली. वरती खोबऱ्याची पखरण.

**शुक्र स्थान – कंचनूर**

(कुंभकोणम पासून १२ कि.मी. दूर)

**महर्षी व्यास कृत शुक्र ग्रहस्तोत्र**

**हिमकुंद मृणालाभम् दैत्यांनाम् परमं गुरूम् ।**
**सर्व शास्त्रप्रवक्तारम् भार्गवम् प्रणमाम्यहम् ।।**

अर्थ – दैत्यांचे गुरू, सकल ज्ञान शास्त्रांचे ज्ञाते, भार्गव नामे कमलनयनी, हिमकुंदप्रमाणे सौंदर्यवान शुक्राला माझे नमन असो.

**शुक्र गायत्री –**

**ओंम अश्वध्वजाय विद्महे धनुर्हस्ताय धीमहि ।**
**तन्नो शुक्रः प्रचोदयात।**

मंदिर कथा – कांचनार या शिवभक्ताला उशीरा कन्यारत्न प्राप्त झाले. परवई वयात आली व चोल घराण्यातील सरदार काली क्कमर याच्याशी विवाह ठरला. दक्षिण भारतात आपली प्रियवस्तू देवाला वाहण्याची प्रथा आहे. म्हणून स्त्रिया आपले लांब सडक केस देवाला वाहतात. एऱ्व्ही उत्तर भारतात केशवपन करणे अशुभ मानतात तर दक्षिणेत बलिदानाचे प्रतीक. ऐन लग्नाच्या धामधुमीत केशदान केल्याने विना केश वधू फारच वाईट दिसेल या चिंतेत तिचा पिता असताना, उमा-रमेशांनी त्याच्या भक्तीवर प्रसन्न होऊन परवई कन्येला केश प्रदान केले व वेळ तारली. या शिवाय अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. मथुरेच्या राजा कंसाला आजारात उतार पडण्यासाठी पलास (पळस) वृक्षाच्या अग्निश्वराची पूजा करायला सांगितली. त्या नंतर त्याला उत्तम आरोग्य प्राप्त झाले.

**मंदीर –** अग्निश्वर व कर्पग अंबिगई (पार्वती) यांचे प्रमुख मंदीर अत्यंत भव्य आहे. त्यावर सुंदर मूर्ती व चित्रे असून त्यवरून प्राचीन कल्पकतेची साक्ष पटते. मंदिराचे आणखी वैशिष्ट्य असे की शिवासमोरील नंदी हिरवा चारा खात आहे. अन्य ठिकाण नंदी जीभ बाहेर काढून बसलेला असतो.

**नैवेद्यम् – मोच्छई परप्पु सादम्**

मुगाची डाळ रात्रभर भिजून ठेऊन तिला फोडणी देऊन केलेला पदार्थ. त्या भात न घालता बनवल्याने त्याला तिखट व चमचमीत चव येते.

**शनि स्थान – तिरुनल्लार**

(कुंभकोणम पासून ५० कि.मी. दूर नल्लार नदीच्या तीरावर)

**महर्षी व्यास कृत शनि ग्रहस्तोत्र**

**नीलांजन समाभासम् रविपुत्रम् यमाग्रजम्।**
**छाया मार्तंड संभूतम् तम् नमामी शनैश्चरम् ।।**

अर्थ – सुर्यपुत्र, यमराजाचा बंधु, छायेचा पती असलेल्या, नीलकांतीच्या शनी देवाला माझा नमस्कार असो.

**शनैश्चर गायत्री –**

**ओंम काक् ध्वजाय विद्महे खड्ग हस्ताय धीमहि**
**तन्नो मंदःए प्रचोदयात।**

मंदिर रचना – हे स्थान पूर्वीच्या फ्रेंच वसाहतीच्या कराईकल प्रदेशात येत असल्याने आजही स्वच्छता व टीपटीप लक्षात येते. मंदिराच्या बाह्य सजावटीवरून हे मंदीर अकराव्या शतकातील चोल घराण्यातील असावे असा अंदाज केला जातो. मंदिराचे राजगोपूर पाच मजली आहे. शनिमंदिरातील मूर्तीमागे सोन्याच्या कावळ्याची मूर्ती आहे, दर्भ ही वनस्पती या मंदिरातील शनिची आवडती वनस्पती आहे. ती अर्पण केल्याने शनिपीडा कमी होतात. किंवा नष्ट होतात. शनिला संध्याकाळी तेलाचा दिवा लाऊन पुढे जायचे असते. अल्पमृत्यू न घडावा या साठी शनीच्या आशीर्वादाने दीर्घायुष्य मिळते. शनीच्या कृपेने आश्चर्यकारक शुभ फळे मिळतात. खजिन्याचा लाभ होतो.

शनिदेवाकडे दुर्दैवी व अघटित घटनांच्यामुळे एक कुप्रभावी ग्रह म्हणून पाहिले जाते. शनीच्या साडेसातीचा काळ प्रसिद्ध आहेच. या ठिकाण ब्रह्म तीर्थ, सरस्वती तीर्थ, अगस्त्यतीर्थ, हंस तीर्थ व नल तीर्थ अशा नावाचे जलाशय आहेत. ब्रह्म तीर्थावर नेसती वस्त्रे पाण्यात दान करून नव चैतन्यशक्तीचा प्रभाव होतो असे जाणवते. ब्रह्म तीर्थाजवळ विनायक मंदिराच्या प्रवेशापाशी एका भिंतीवर शेंडीवाल्या नारळाला जोरात फेकून तो फोडून अर्पण करण्याची प्रथा आहे. नल दमयंती आख्यानात शनीदेवाला योग्य तो सन्मान न मिळाल्याने त्याच्या कोपाने नलाला झालेली कष्टमय परिस्थिती सुप्रसिद्ध आहे.

येथील शिवलिंग स्वयंभू आहे. या मंदिरात दीप लावण्याची प्रथा आहे. येथे गरिबांना अन्नदान, वस्त्रदान करण्याची प्रथा आहे. ये़थील आणखी एक वैशिष्ट्य असे की शनिदेवाखेरीज या स्थानी अन्य कोणतीही उपमंदिरे नाहीत.

**तिरुवळंचूली –** शनिदेवाचे हे स्थान तिरुनल्लार पेक्षा कमी प्रसिद्ध आहे. तरी हे स्थान शनिग्रहाचे जागृत स्थान मानतात. कुंभकोणम पासून पाच कि मी. दूर स्वामी मलई पासून एक किमीवर या मंदिरात भैरव रूपातील शिव कुत्र्यावर आरूढ आहेत. कावेरी नदीत स्नान करून दर्शन घेतल्याने यश मिळते असे मानतात.

**नैवेद्यम् – ईलू शाडम**

तिळाला सोनेरी रंग येईपर्यंत परतून, तुपाची फोडणी देऊन तयार भातावर आमटीप्रमाणे घालून कालवलेला भात.

**राहू स्थान – तिरु नागेश्वरम्**

(कुंभकोणम पासून ५ कि.मी. दूर)

**महर्षी व्यास कृत राहू ग्रहस्तोत्र**

**अर्धकायं महावीर्यम् चंद्रादित्य विमर्दनम् ।**
**सिंहिका गर्भ संभूतम् तं राहूम् प्रणमाम्यहम् ।।**

अर्थ – सीहिकेच्या गर्भात जन्म पावलेल्या, अर्धमानव शरीर धारण केलेल्या, चंद्र अणि सूर्याचा लीलया पराभव करणाऱ्या अति बलाढ्य राहूला माझे वंदन असो.

**राहू गायत्री –**

**ओंम नागध्वजाय विद्महे पद्महस्ताय धीमहि**
**तन्नो राहुः प्रचोदयात्।**

मंदिर इतिहास – कुंभकोणम पासून पाच किमी दूर तिरुनागेश्वरम् मंदीर तमिळनाडू राज्यातील शिवमंदिरापैकी एक अतिभव्य मंदीर आहे. पंधरा एकर जागेतील या प्रचंड मंदिराचा इतिहास कमीतकमी पंधराशे वर्षे जुना आहे. चोल राज्यांच्या कारकीर्दीत निर्माण झालेल्या या मंदिराच्या नैऋत्य कोपऱ्यात राहू देवाची मूर्ती आहे. मंदिराच्या चारी बाजूंनी प्रचंड तटबंदी आहे. अनेक उपमंदिरे, मंडपम् यांनी सर्व परिसर गजबजलेला असतो. १०० खांबी रथाकार मंडपम्, ध्वजस्तंभ, बलिपीठम्, प्रचंड मोठे शूल तीर्थ नावाचा तलाव आहे.

तेथे राहू नागरूपात पत्नी सींही व चित्रलेखा यांच्या सह स्थापला आहे. प्रथम पत्नीचे निधन झाले असेल तर दुसऱ्या पत्नीच्या दीर्घायुष्यासाठी राहू दोष निवारण्यासाठी येथे प्रार्थना-अर्चना करावी.

राहू काल – दिवसातील दीडदिवस हा राहू काल मानला जातो. त्या काळात मंगलकार्ये, प्रवास, खरेदी किंवा महत्वाची कामे टाळली जातात. रविवारी राहू कालात राहूची विशेष पूजा त्या मंदिरातील मोठ्या सभामंडपात केली जाते.त्यावेळी दुधाचा अभिषेक मूर्तीला करताना ते दूध निळसर रंगाचे भासते. रविवारच्या पूजेत दुधाच्या अभिषेकाची व अर्चनेची सोय असते. त्या ठिकाणी प्रत्यक्ष जाता येत नसेल तर पैसे पाठवून पूजेचा प्रसाद

पोस्टाने मिळवता येतो. येथे रोज शेकड्यांच्या संखेने राहू पूजा दिवसातून तीन वेळा चालते.
महर्षी भृगूंनी या मंदिर परिसरात प्राचीन काळी तपश्चर्या केली होती. येथे शिवांच्या शिवाय संत सुंदरर व त्यांची पत्नी परवाई यांच्या मूर्ती आहेत. येथील हातमागावर बनवलेली रंगीत बारीक काठाची पांढरी शुभ्र धोतरे प्रसिद्द आहेत. चाफ्याची फुले येथे विशेष महत्वाची मानतात.

**नैवेद्यम् – उत्तलम परुप्पु सादम.**

उडीद डाळ तावून तळून त्यावर फोडणी देऊन त्याची भातावर पेरणी केलेला मसाले भात.

केतु स्थान – कीळ पेरुम पल्लम्

(१) कुंभकोणम पासून ६५ कि.मी. दूर बांबूच्या बनात शिवाय

(२) कालहस्ती मंदीर रेणीगुंठा स्टेशना पासून २५ किमी वर

(३) शिवम् जियम् कुंभकोणम पाशी

**महर्षी व्यास कृत केतू ग्रहस्तोत्र**

**पलाशपुष्प संकाशम् तारकाग्रह मस्तकम् ।**
**रौद्रम् रौद्रात्मकम् घोरम् तं केतुं प्रणमाम्यहम् ।।**

अर्थ – पलाशपळसाच्या फुलासारखा रक्त वर्णाचा, तारका ग्रहाचे मस्तक असलेला, रौद्र अविर्भावातील हे केतु तुला माझे नमन असो.

**केतु गायत्री –**

**ओंम अश्वध्वजाय विद्महे शूलहस्ताय धीमहि**
**तन्नो केतुः प्रचोदयात।**

**स्थान महिमा –** केतू व राहू हे चंद्र सूर्याच्या कक्षांचे छेदन बिंदू असून पत्रिकेत एकमेकांच्या समोर दिसतात. पौराणिक कथेप्रमाणे सागरमंथानातून निर्माण झालेल्या अमृताचा एक घोट केतूच्या मुखात गेला पण ते त्याच्या पोटात न पोचल्याने शिरच्छेद केल्याने केतूला पंचमुखी सर्पाचे शीर्ष लावलेले दिसते. केतूसाठी काळ्या कपड्यांचा धारक रथ मातलीने अर्पण केला त्याच्या रथाला १० घोडे आहेत. एका हातात गदा व दुसऱा हात वर देणारा. चांदीचा पत्रा असलेला सर्पराज असे यामूर्तीचे वर्णन केले जाते.

केतूमंदिरांना भेट अशासाठी देतात की ज्यांच्या पत्रिकेत शुक्र शुभ स्थानात असेल तर या मंदिरात अर्चना केली तर ती व्यक्ती आकस्मात मालामाल होण्याची शक्यता असते.

**कालहस्ती –** हे नाडी पट्टयातून वर्णन केलेले केतूचे प्रख्यात स्थान आहे. एक अति भव्य व विस्तीर्ण मंदीर तिरुपतीच्या वाटेवर रेणीगुंठ्यापासून २५ किमी दूर आहे. इथे कार्तिक महिना व जेष्ठ महत्वाचा असतो. त्या महिन्यात रविवारी केतूची पीडा असणाऱ्यांना या मंदिरांतून पूजा करणे गरजेचे आहे.

**शिवम जियम् –** या कुंभकोणम जवळील या मंदिराचे स्थान भव्य व दणदणीत आहे. य़ा मंदिरात केतू शिवाय शनी, राहूचे स्थानही आहे. चंदनाचा वृक्ष पवित्र मानतात. सर्पदोष असेल तर येथे शांती करावी.

**नैवेद्यम् –** कोल्लु पोडी सादम्

हरभऱ्याच्या डाळीला रात्रभर भिजवून फुगवल्यावर त्यात तयार भात मिसळून फोडणी दिलेला, तिखट भात.

❑❑❑

# ३. नवग्रह यात्रेची आखणी अशी करता येईल –

**सोई व खर्च**

रेल्वेची सोय – मुंबईहून पुणे–सोलापूर करत तीन गाड्या व नागपुरकडून विविध ५–६ गाड्या चेन्नई सेंट्रलला जाणाऱ्या आहेत. त्यानंतर जवळच मद्रास इगमोर स्टेशनवरून कुंभ कोणम, मायिलाडुदुरै कडे जाणाऱ्या अनेक गाड्या रात्री निघतात त्या साधारण पहाटे पोहोचतात. या शिवाय आठवड्यातील काही दिवशी डायरेक्ट जाणाऱ्या ट्रेनने वैदीश्वरकोईल, पांडिचेरी, तिरुवन्नमलाई, तंजावूर अशा गावी पोहोचता येते. बंगलोरला पोहोचून तेथूनही म्हैसूर ते माय़िलाडुदुरै गाडीने संध्याकाळी ७ ला बसल्यास कमी दगदग करता कुंभकोणमला पहाटे ६ ला उतरता य़ेते. शिवाय एक गाडी मुंबईहून तिरुपतीवरून कांचीपुरम, विल्लुपुरम करत त्रिची, मदुराई अशी नागरकोईल एक्सप्रेसही उपयुक्त. टॅक्सी– बसची सोय – चेन्नई सेंट्रल बस टर्मिनस रेल्वेस्टेशन पासून ७ किमी दूर आहे. तेथे रिक्षाने जावे लागते. तेथून मैलाडूदुरई बसने वैदीश्वरन कोईलला उतरावे. तेथून टॅक्सीने नव ग्रहमंदिरे करावी. शक्यतो मोडके तोडके इंग्रजी येणारा ड्रायव्हर पकडावा. राहू, मंगळ, शनी, गुरू मंदिरात भली मोठी रांग असते. सूर्य मंदिरात दोन तासाच्यावर वेळ लागतो. चंद्राचे मंदीर दुपारी चार तास बंद असते. पाँडेचरी, चिदंबरम, कुंभकोणम, तिरुवन्नमलाई, तंजावूरसाठी अनेक बसेस सोईच्या व कमी खर्चाच्या आहेत.

हॉटेलची सोय – नॉनएसी लॉज डबलबेडसाठी ३०० रु.च्यापुढे, एसी ८०० –१००० रु. च्यापुढे. वैदीश्वरन कोईलमधे हॉटेल सदाभिषेकम व शुभम चांगल्या दर्जाची हॉटेल्स आहेत. जेवणात भरपूर भात–रसम–सांभार खाण्याची तयारी ठेवावी. यात्रेचा सर्व खर्च दिवसाला माणशी २५०० रुपये धरावा. नवग्रह यात्रेला तीन दिवस पुरेसे.

अनेक नाडी ग्रंथ प्रेमींची नवग्रह मंदिरांना भेटी द्यायची, मनोभावे पुजा–अर्चना करायची इच्छा असते. अशांसाठी यात्रा कंपन्यांनी नाडी केंद्रांशी संपर्क केल्यास अनेक इच्छुकांची नवग्रह यात्रेच्या पॅकेजने सहलीची सोय करता येणे शक्य आहे.

❐❐❐

**सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ व संशोधक डॉ. र. ना. शुक्ल सांगतात...**



नाडीग्रंथांची सामान्यांना उपयोगिता काय? आपल्या संकटांना यशस्वीपणे तोंड द्यायला मानसिक आधार मिळवायसाठी सामान्यांना सोईचे. संकटांवर मात करायला सुचवलेल्या मंदिरातच जावे का? हो. कारण त्या मंदिरांची स्थापना या करिता केली गेली आहे. इतरांनी केलेला जप आपल्याला फलदायी ठरतो? हो. मग टेपवर मंत्र वाजवून ती ऊर्जा स्पंदने मिळवता येणार नाहीत का? टेपवर मंत्र उच्चारून ती ऊर्जा स्पंदने मिळवता येतील. पण त्यांची प्रत कमी असू शकेल. आपण ऊर्जा मोजणारी यंत्रे आहेत म्हणता ती कोणती? ती कुठे मिळतात?ती बाजारात मिळतात. सनातन संस्थेने तशी ती मिळवून शोध ही घेतला आहे.

# ४. दक्षिणेची ही श्रद्धापूर्ण सफर कशासाठी ?

सनातन धर्माच्या तत्वज्ञानाचे दोन प्रमुख आधार आहेत. एक - पुनर्जन्म सिद्धांत तर दुसरा - कर्मफल सिद्धांत. पुनर्जन्म मानावा तर पुरावा काय हा असा संभ्रम होतो. त्याला पुरावा म्हणून नाड़ी ग्रंथ भविष्य हे भक्कम आधार किंवा पुरावे आहेत. कारण व्यक्तिच्या पूर्वजन्मातील कर्मफले त्याच्या सध्याच्या परिस्थितीला जबाबदार असतात. असो.

नाडीकर्ते महर्षी आपल्या अतिंद्रीय ज्ञानाचा बळावर सांगतात की त्या पूर्वजन्मातील कुकर्मांवर सध्याच्या जन्मातील सत्कर्मांनी मात करता येते. ती कशी करावी याचे मार्गदर्शन नाड़ी महर्षी प्रामुख्याने १३ व १४ व्या कांडातून करतात.

मंदिरांना भेटी, अन्नदान, वस्त्रदान, जलदान, दक्षिणा, दीप-दर्शन, दीनदुखी लोकांची आपल्या परीने सेवा करून त्यांच्या तृप्ती व आनंदाचे आशीर्वादात्मक तरंग- स्पंदने मिळवायची असतात. ते आशीर्वाद आपल्या पूर्व कृत्यांच्या वाईट - नकारात्मक भावनांचा नाश करतात व मनुष्याला या जन्मात त्या पापापासून मुक्ती होते, असे या मागचे शास्त्र आहे. आता या बाबत पाश्चात्य देशात प्रयोगशाळेत शोधकार्य करून पुनर्जन्म सिद्धांत सत्य म्हणून मान्यता पावला आहे.

काही धर्म संकल्पनांमधे पुनर्जन्माला मान्यता नाही. परंतु अंतिम निवाड्यापर्यंत खोळंबलेले आत्मे निवाड्यानंतर ज्या स्वर्गात पोचणार तेथे त्यांचा एका अर्थाने पुनर्जन्मच होणार आहे. पुनर्जन्माला आधार कर्मफल सिद्धांत असून बऱ्या-वाईट कर्मांच्या आधारे पुनर्जन्म भोगण्यासाठी घ्यावा लागतो. सध्याच्या काळत नैतिकतेच्या तत्वज्ञानातून सत्कर्म किंवा कुकर्म अशा पारड्यात घालून व्यक्तींच्या कर्मांचा विचार केला जातो आणि व्यक्तिला चालू जीवनात दंड किंवा शिक्षा अथवा मान-प्रशंसा मिळून न्याय होतो. मात्र ही नैतिकता सोईनुसार कुकर्मांवर शालीप्रमाणे पांघरून खोटी प्रतिष्ठा मिरवता येते. पण पुनर्जन्म सिद्धांतातून कुकर्मांची नोंद आकाशिक लेखनाद्वारे केली असल्यामुळे या किंवा नंतरच्या जन्मात त्याची भरपाई केल्याशिवाय सुटका होत नाही. योगी अरविंदांनी सावित्री या महाकाव्यात Fruits of forgotten deeds (न आठवण्याऱ्या पुनर्जन्मातील कर्मफळे) असे याबाबत म्हटले आहे. ती फळे मानवाला भोगणे प्राप्त आहे.

हिंदू संस्कृतीच्या अनेक वैशिष्ट्यांमधे नवग्रह देवतांचे स्थान अदभूत आहे. ज्योतिषशास्त्राला उपवेदाचा मान आहे. या शास्त्राचा आधार आकाशस्थ ग्रहगोलांचे भ्रमण व त्यांचा पृथ्वीवरील जीवनावर होणारा बरा-वाईट परिणाम आहे. याचे रहस्य प्राचीन काळापासून ऋषीमुनींना ज्ञात झाले. त्यांनी प्रज्ञा, अनुमान व निरीक्षणाच्या आधारे त्यांचे नियम बनवले आणि मानवी जीवनातील बदलांची काटेकोरपणे नोंद केली.

ज्या ग्रहगोलांच्या भ्रमणाच्या कक्षा व त्या पलिकडील अवकाशाचे निरीक्षण झाले त्यातून प्रत्येक ग्रहाचे नाव, त्याची भ्रमणगती, चुंबकीय शक्ती, त्यावरून येणारे विविध किरण किंवा इलेक्ट्रोमॅग्नेटिक तरंग किंवा लहरी यावरून ग्रहांना मानवी रूप व स्वभावधर्म देण्यात आले. पूजाआवी मानवी संस्कृतीने त्यांना देवता स्वरूप मानले. आराधना, साधना करून त्या देवतांचा भावनिक आधार प्राप्त करून घेण्यासाठी त्यांना देवत्व देऊन मंदिरात स्थापना केली.

दक्षिण भारतात नवग्रह मंदिरांची वैशिष्ठ्यपूर्ण निर्मिती कावेरी नदीच्या खोऱ्यात कुंभकोणम जिल्ह्यात प्रामुख्याने झाली. गेल्या १५०० ते २००० वर्षांच्या इतिहासात या मंदिरांचा उल्लेख अनेक प्राचीन काव्यातून, भक्तिगीतातून वरचेवर होतो. शिवमंदिरातील पिंडीच्या खालोखाल या मंदिरांना मान मिळतो. हजारो भाविक नाडी ग्रंथांतून या नवग्रह मंदिरांना भेट देण्याच्या आदेशाचे पालन करून आपल्या पूर्व कृत्यांचा कुप्रभाव संपवण्यासाठी भाविकतेने भेट देतात. महाराष्ट्रातील शिंगणापूर येथील शनिमंदीर, कोणार्क येथील येथील सुर्यमंदीर, काश्मीर खोऱ्यातील अवंतीपूर येथील मार्तंड मंदीर ही इतर ग्रह मंदिरे प्रसिद्ध आहेत. याशिवाय अनेक मंदिरे काळाच्या ओघात, विविध कारणांनी नष्ट झाली. मंदिरे ही पूर्वीच्या काळात धार्मिक, सांस्कृतिक व राजकीय कार्याची प्रमुख केंद्रे होती. मंदिरांची निर्मिती, संरक्षण, देखभाल व अर्थार्जन हे सारे त्या परिसरातील राजे-राजवाडे, श्रीमंत व्यापारी, विद्वान ब्राह्मणांच्यातर्फे केले जात असे. अशा या ग्रहांच्या स्थानांची- मंदिरांची ओळख तेथे प्रत्यक्ष जाऊ इच्छिणाऱ्यांसाठी करून देण्यात येत आहे.

❑❑❑

कै. डॉ. विलास चिपळूणकर तंत्रशिक्षण अधिकारी आणि पुज्य चिले महाराजांचे भक्त .... काव्यात नाडी ग्रंथांची महती गाताना म्हणतात,



जनता जनार्दनाच्या सेवेचे। नाडीग्रंथ वाचिता इमाने साचे।।

निश्चित पुण्य जोडेवाचकाचे। जातक जाई मार्गाते।।

---

ग्रुप कॅप्टन राकेश नंदा म्हणतात...



माझे सारे जीवन बदलून टाकणाऱ्या नाडी ग्रंथातून अनेकांना प्रेरणा द्यायचे कार्य घडते.

# ५. तमिळनाडू मधील आणखी काही वैशिष्ट्यपूर्ण मंदिरे

नवग्रहांशिवाय तमिळनाडूतील काही स्थाने अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण असून त्यांचा उल्लेख वारंवार नाडी ग्रंथांतून केला जातो. काही विशिष्ठ कामासाठी, संकट निवारणासाठी, आरोग्य समस्येसाठी या स्थानांना भेट देण्याचे सांगण्यात येते. अशा विशेष मंदिर स्थानांची थोडक्यात ओळख.

तिरुमनन चेरी येथील शिव-पार्वतीचे कल्याण सुंदरम मंदिर

विवाह समस्येवर उपाययोजना

दिसायला सुंदर, शिक्षणात हुषार, गृहकृत्यदक्ष, भरपूर पगाराची नोकरी, घरची परिस्थिती छान, पत्रिका पटकन जुळणारी, अशा वर्णनाची वधू आणि बळकट प्रकृतीचा, कर्तृत्ववान, लठ्ठ पगाराच्या नोकरीवर, विदेशात वाऱ्याकरूनही भारतीय वधूशी लग्न करू इच्छिणाऱ्या आदि सुरस वर्णनाच्या वरांचे विवाहयोग पटकन जमत नाहीत असे कित्येकदा घडते. त्यावर मात म्हणून नाडी महर्षी तिरुमननचेरीच्या मंदिरातून हार घालायच्या सोहळ्यातून शिवपार्वतीचे आशीर्वाद घ्यायला सांगतात. प्रस्तूत लेखकांच्या अपत्यांनाही नाडी ग्रंथांच्या वाचनातून असाच आदेश आला होता. तिरुमनन चेरी हे गाव मइलाडूदुरै (मायावरम्) पासून २५ किमी वर आहे. सकाळी आठ पर्यंत पोहोचावे. १० रुपयांचे तिकिट काढावे. २५-३५ रु.चा हार पूजा साहित्या घ्यावे व प्रवेशासाठी थांबावे. वेळ झाली की एका बाजूला उपवर तर दुसऱ्या बाजूला उपवधू यांना ओळीने बसवतात. मध्यभागाच्या जागेत विवाहित जोडप्यांनी बसायचे असते. अन्य भाविकांनी थोडे मागे बसून घ्यायचे असते. अर्चनेच्या फुलांच्या हाराचा स्वीकार करत एक पुजारी मुख्यमूर्तीशी मांडामांड करतात. तामिळ मधून आरती पूजा होते. नंतर मुख्य पुजारी उपस्थित उपवधू-वरांना आदेश देतात की या ठिकाणी विवाह संपन्न व्हावा या आकांक्षेने आलो आहोत, ती कामना पूर्ण व्हावी. झाली की परतफेड म्हणून जोडीदारासह या मंदिरात पुन्हा जरूर येऊन व संकल्प पूर्ती करीन. मिळालेला हार विवाह होईपर्यंत जपून ठेवेन. विवाह चांगल्या प्रकारे व वेळ न जाता व्हावा ही प्रार्थना रोज करीन आदि संकल्प सोडून त्या प्रमाणे आचरण करण्याचे वचन घेऊन बाहेर यावे लागते. काही जोडप्यांशी संपर्क करता त्यांचे विवाह झटपट झाल्याचे व चांगला जोडीदार मिळाल्याचे सांगण्यात आले. सर्व कामाला एक तास लागतो. रोज ३-४ वेळा अशा पूजा होतात.

आयुष्य होमाची सांगता - तिरू कडायूरचे शिव मंदिर

केस आय सी यू मधील, शेवटच्या दर्शनाला नातेवाईकांना बोलावणी गेलेली, वैद्यक उपाय संपले यापुढे ईश्वरेच्छा असे डॉक्टरांचे मत. अशा परिस्थित आयुष्य होम कर केस वाचेल असे महर्षी सांगतात. तेंव्हा चमत्कारी फरक जाणवतो. केस वाचते. अशा या चमत्कारी होम करण्याचे ठिकाण म्हणजे तिरु कडायूरचे शिव मंदीर. येथील आयुष्य होम केलेल्यांचे संकल्प अल्पावधीत फलित होतात असा अनेकांचा अनुभव आहे. उपाय दूरस्थ व खर्चिक असला तरी हटकून फलदायी आहे.

षष्ठ्यब्दी पूर्तीच्या आनंद सोहळ्याचे मंदिर येथेच आहे. या ठिकाणी विवाहित जोडप्यांपैकी पतीच्या

६१व्या वाढदिवसाला येथे येऊन विवाहाचा सोहळा पुन्हा त्याच पत्नीशी साजरा करण्याचा विधी केला जातो. अघोर मूर्तीचे भीषण रौद्र सौंदर्यही याच ठिकाणी पहायला मिळते.

सरस्वती देवीच्या मंदिरात लेखन सामुग्रीचे दान पुण्य

**मुलांच्या विद्या-** अभ्यासामधील समाधान कारक प्रगतीसाठी या मंदिरात जायला सुचवले जाते. कुतानूर या गावातील हे मंदिर आहे तसे लहान. पण त्याची ख्याती दूरवर पसरली आहे. मंदिरात दसऱ्याच्या निमित्ताने विविध नृत्य-गायन कलाकारांचा कार्यक्रम पाहायला मिळतो. मंदिराच्या बाहेर दुकानातून पुस्तके, वह्या, पेन-पेन्सिली गरजूंना दान करण्याची आगळी प्रथा आहे. या ठिकाणी दर्शनासाठी छोट्या पण त्यातून तेल किंवा तूप भरून, वाती-काड्यापेटी ट्रे मधे तयार मिळतात. मंदिरातील मुख्य मूर्तीच्यासाठी मनात आराधना करून दिवे लावताना सात्विक आनंद मिळतो.

❒❒❒

**मंदिरात पूजा-अर्चना, जप साधना केल्याने काय लाभ ?**

नवग्रहांच्या मंदिरांना भेट देऊन त्यांची पूजा-अर्चना करून हिंमतीने लढा देण्याचे, संधीचे सोने करण्याचे, निश्चय करणे अपेक्षित आहे. भक्तांची मनस्थिती उच्च विचारांची, संकल्प, निश्चय करण्याची होण्यासाठी मंदीर प्रांगणातील स्थापत्याचा आस्वाद घेणे, चित्रे, मूर्ती यामधून इतिहासाची कल्पना करणे, दीप लावून काळाच्या अंधारात दडलेला मार्ग शोधणे, प्रदक्षिणेच्या फेऱ्या मारताना मनात स्तोत्रे, काव्य, जप-साधना करून आपली मनस्थिती सकारात्मक व निश्चयी करण्याचे काम होते. त्या वेळी मंदिरातील वातावरणात सत्प्रवृत्तींच्या लहरींना अनुकंपनांना, आकर्षित करण्याचे सामर्थ्य येते. असे प्रत्येक भाविकाच्या सत् प्रवृत्तींचे प्रक्षेपण परस्पर घडते. मंदिराच्या आसमंतातील धीर गंभार शांतता आल्हाददायक वाटते ती याच कारणाने. आसपासची अस्वच्छता गोंगाट, कोंदटपणा आदी गोष्टी अशा वेळी गौण करून मनाची सकारात्मक स्थिती जो ठेवतो, सहमुभूतीयुक्त स्पंदने, अनुकंपने जो निर्माण करतो त्यालाच देव पावतो.

गर्भ जसा मातेच्या गर्भाशयाशी नाळेने जोडलेला असल्याने त्या गर्भाची व धारण करणाऱ्या, पोषण करणाऱ्या मातेची इच्छा एकच बनते (त्यालाच डोहाळे म्हणतात) त्याच प्रमाणे मानव ईश्वररूपी मातेच्या विश्वरूपी शरीराला श्रद्धेच्या नाळेने जोडला गेला तर त्याची इच्छा व ईश्वराची इच्छा सहानुभूतीयुक्त अनुकंपनाच्या (Sympathetic Vibrations) नियमानुसार एकच बनते व तो ईश्वर श्रद्धा युक्त मानवाची इच्छा पूर्ण करतो. प्रार्थनेला फळ का मिळते, नवसाला देव का पावतो, थोडक्यात खऱ्या श्रद्धेने केलेली कोणतीही कृती फलद्रूप का होते याची शास्त्रीय उपपत्ती कॅमरर, युंग, पॉल आदी पाश्चात्य शास्त्रज्ञांनी शोधलेल्या अनुक्रमे क्रमबद्धतेच्या (seriality) व अर्थपूर्ण घटनात्मकतेच्या (synchronicity) ईश्वर निर्मित विश्वाच्या अंगभूत गुणधर्मामुळे सफल होते. हे आता विज्ञानानेही मान्य केले आहे. (संदर्भ - विज्ञान आणि चमत्कार - लेखक - प्राचार्य अद्वयानंद गळतगे)

# ६ नाडी ग्रंथ प्रश्नोत्तरी

**प्रश्न – नाडी म्हणजे काय?**

उत्तर : नाडी हा शब्द मराठी भाषिकांना एक तर डॉक्टरांनी आरोग्यासाठी मनगटावर ठोके पाहून उपाय योजना करायची पद्धत असे माहिती असते, नाहीतर मराठी विनोदी नट स्व. दादा कोंडके यांच्या अजागळ चड्डीची आठवण येऊन हसायला येते. मात्र या शिवाय गेल्या काही वर्षांपासून नाडी शब्दला आणखी एक अर्थ असतो याचा शोध कित्येक मराठी भाषिकांना लागला आहे. याचे कारण म्हणजे महाराष्ट्रात नाडीग्रंथ भविष्य कथन पद्धतीचे आगमन.

नाडी या शब्दाचा तमिळ भाषेतील अर्थ शोधात असणे, शोध घेणे असा आहे. या शब्दाच्या अनेक छटा कोशात अत्यंत मोठ्या प्रमाणात साठवले ज्ञान किंवा संहिता आहे. या दोन्हींचा एकत्र अर्थ केला तर असे म्हणता येईल की तमिळ भाषेतील ताडपत्रावरील कूट लिपीमध्ये कोरून लिहिलेली व्यक्तीविशेषाची भविष्य कथने म्हणजे ताडपत्रावरील नाडी पट्ट्या हे भविष्य ग्रंथ होत.

**प्रश्न : नाडीग्रंथ कोणी लिहिले?**

उत्तर : आपण ज्या महर्षींची नावे रामायण, महाभारत, भागवत आदि धार्मिक ग्रंथात वाचतो, त्या वसिष्ठ, विश्वामित्र उर्फ कौशिक, पराशर, भृगू, अगस्त्य, काक भुशुंडि, शुक, अत्री, मार्कंडेय आदि महर्षींच्या नावाने नाडीग्रंथ उपलब्ध आहेत. या शिवाय नंदी, पुल्लिपाणी, बोहर, मच्छ, कमल, सदानंद, जेमिनी, मीनाक्षी, धन्वंतरी आदि उत्तर भारतीयांना अपरिचित महर्षींनी ही नाडीग्रंथ लेखन केले आहे. प्रत्येक भविष्य कथनाच्या वेळी प्रथम शिव-पार्वतीला (ईश्वरचरणी) वंदना करून त्या त्या नाडीचे कर्ते महर्षी म्हणतात, 'या जातकाचे (भविष्य जाणून घ्यायला इच्छुक व्यक्तीचे) भविष्य फळ कथन करण्यासाठी मला प्रेरणा द्या' असा कृपाआशीर्वाद मागतात. एक - दोन श्लोकात शिव स्तुती केली जाते. त्यामुळे प्रत्येक महर्षीचे नावाने ग्रंथ रचना केली आहे असे मानावे लागते. तथापि हे रचना कार्य एका व्यक्तीच्या जीवनापुरते सीमित नसावे. पिढ्यानपिढ्या ते चालत आले असावे. म्हणून ती घराण्यातील कामामुळे उपनावात आजही कौशिक, अत्री अत्रे, वसिष्ठ आदि आडनावाचे लोक विशेषतः उत्तर भारतात आढळून येतात. आत्ता पर्यंत अनेकांना अनुभवायला आलेल्या नाडी भविष्यातून ७२ महर्षींच्या कार्याचा उल्लेख येतो.

**प्रश्न : नाडी ग्रंथ भविष्य का पहावे?**

उत्तर : प्रत्येक व्यक्तिला जीवनात कठीण प्रसंगात नक्की मार्गदर्शन करणारे सापडत नाहीत. कोर्टात केस करावी का? त्यात अपयश येईल का? या प्रश्नाचे उत्तर कायद्याच्या विषयात निष्णात वकील, 'तुम्ही हरणार - कोर्टाची पायरी चढू नका' असे कधीच सांगत नाहीत. त्याना केस जिंकता येणार नाही याची खात्री असूनही ते अशीलाला 'नक्की जिंकून देतो' असे छातीठोकपणे सांगतात. अशा वेळी अत्यंत रोखठोक शब्दात 'केस लढू नये, हरावे लागेल' असे नाडीग्रंथातून खणखणीतपणे सांगून वेळीच जागे केले जाते. त्यामुळे एक निष्पक्ष सल्लागार म्हणून नाडी ग्रंथांचे अवलोकन केले जाते. नोकरी मिळणे, मिळाली तर न टिकणे, धंद्यात खोट, असाध्य रोग, रेंगाळली लग्ने, प्रमोशन अशा प्रापंचिक चिंता, प्रश्न भेडसावत असतात. त्यांना योग्य मार्गदर्शन करून व्यक्तीच्या कर्तृत्वाला प्राधान्य दिले जाते. तथापि

सर्वच गोष्टी मानवी कर्तृत्वाच्या आवाक्यात नसतात. अभ्यास कसून करणे आपल्या हातात आहे, मात्र गुण देणे दर्जा ठरवणे आपल्या हातात नाही. तसेच आपल्या श्रम कष्टाशिवाय  अन्य घटक – जे कार्याला यशस्वी करण्यासाठी लागतात – ते आपल्या बाजूने असावेत, निदान विरोधात जाऊ नयेत म्हणून काही धार्मिक पूजा – अर्चना, जपजाप्य, अन्नदान, वस्त्रदान, जलदान किंवा पैशाचे दान करायला सुचवले जाते. त्याद्वारे नाडीतून मार्गदर्शन मिळून आपले पेच/तात्कालिक समस्यांचे निराकरण केले जाते. म्हणून एक विचारी मार्गदर्शक, सदभावनेचा सल्ला देणारे म्हणून नाडी ग्रंथ भविष्याचे अवलोकन करावे.

याशिवाय काहींना या भविष्य कथनाच्या पद्धतीचा ज्ञानाचा शोध घेण्याची इच्छा होते. त्यांना वैयक्तिक भविष्यात रस नसतो. पण ही संहिता, कधी, कशी कुठे लिहिली असावी? कोणत्या लिपीचा वापर केला असावा? लेखन कार्य कसे केले असेल अशा जिज्ञासा आकर्षित करतात. ते त्या मार्गाने नाडीग्रंथांचा आस्वाद घेतात.

**प्रश्न – एखाद्या नाडी केंद्रात नाडी पट्टी मिळाली नाही तर नव्या पट्ट्यांचा स्टॉक येईपर्यंत एक दोन महिने थांबा आणि नंतर विचारणा करा असे सुचवले जाते. तेवढा वेळ थांबणे शक्य नसते त्या वेळी काय करावे?**

उत्तर : नाडी भविष्य पहायचे ठिकाण ज्या शहरात असेल त्या शहरातील अन्य नाडी केंद्रांची आधीच अपॉइंटमेंट घेऊन ठेवावी. एके ठिकाणी निराशा झाली तर दुसरीकडे ते पहायला जाता येते. बर्याअचदा अशा दुसर्या् केंद्रात पट्टी सहजासहजी सापडून जाते. मात्र वेळेची अनुरूपषष आखणी करावी.

**प्रश्न : शांतीदीक्षा कांडात सांगितलेली कर्मे करूनही नंतर भविष्य पाहिले तर पुन्हा शांतीदीक्षा करावी का?**

उत्तर : अनेकांना उत्सुकतेपोटी, अनिवार्य घटनाक्रमामुळे किंवा सहजपणे नाडी ग्रंथ पहायची संधी येते. त्यातील भविष्य कथनाच्या समावेत काही पूजा अर्चना, जप आदि करायला सुचवले जाते. त्या वेळी साहजिकच मनात प्रश्न उद्भवतात की आधी केलेल्या शांतीदीक्षेचे काय? ती केली तर पुन्हा मी का करावी? प्रत्येक वेळी असे सोपस्कार करायचे तरी किती वेळा?

नाडीग्रंथांची रचना व्यक्तिच्या सांसारिक चिंता कटकटी, आजार यावर यशस्वीपणे मात करण्यासाठी केलेली आहे. ज्या महर्षींनी प्रज्ञाचक्षुंनी भविष्य पाहिलेले आहे तसे आपल्या पूर्व कर्मांची पुर्व जन्मातील बर्यारवाईट कर्मांची मांडणी देखील समजून येते. करुणेच्या सदभावनेने त्यांनी एखाद्याला एकापेक्षा जास्त नाडी पट्ट्या पहायची संधी दिली तर त्यांना याचीही पूर्ण कल्पना असते की याने आधी सांगितल्याप्रमाणे शांतीदीक्षा केली किंवा नाही. कारण अनेकदा असे सरळ म्हंटले जाते की पूर्वी सुचवूनही शांतीदीक्षा केलेली नाहीस आता तरी कर अन्यथाच कथन केलेले अपेक्षित भविष्य सफल होणार नाही. कधी महर्षींव असे ही म्हणतात, तू केलेली शांतीदीक्षा मला मिळाली, तरीही मी पुन्हा सुचवलेली शांतीदीक्षा जरूर करावी. या मागे महर्षींना त्याच्या पुर्वकर्मातील उरलेल्या कृत्यांसाठी आणखी शांतीदीक्षा करणे अपेक्षित असते. ही व्यक्ती पुन्हा नाडीग्रंथ पाहील त्यावेळी आणखी सोपस्कार सांगू. सर्व एकदम सांगितले तर पैसा, वेळ, मानसिक स्वास्थ्य या कारणांनी तो काहीच करणार नाही. याला हप्त्या हप्त्यात सांगणे सयुक्तिक ठरेल असे म्हणावे लागते. कधी कधी काही सोपस्कार करायची गरज नाही असे म्हटले जाते.

❒❒❒

# ७. नाडीग्रंथ प्रकार

नाडी भविष्य सर्व साधारणपणे लेखी स्वरूपात व्यक्तीस अवलोकनाचे असले तरी नाडी भविष्यात विविध प्रकार आढळतात. त्यानुसार कथन पद्धती ही वेगवेगळ्या पहायला मिळतात.

**१. भाषेच्या अनुसार :** सामान्यपणे नाडी ग्रंथ तमिळ भाषेतील प्राचीन ग्रंथम आणि ब्राह्मी लिपीच्या संधीप्रकाशात तयार झाल्या असाव्यात असे अभ्यासकांचे मत आहे. काही लोकांच्या कथनातून तेलुगु भाषेत लिहिलेल्या होत्या असे म्हटलेले आढळून येते. कर्नल ऑल्कॉट यांनी थियॉसॉफिकल सोसायटीच्या वतीने नाडी पहायचा उल्लेख सापडतो. त्यात त्यांचे एक तेलुगु स्नेही त्यांना एका मद्रासच्या दक्षिणेत एका गावातील नाडी पट्ट्या पहायला घेऊन गेल्यावर पट्टी सापडली त्यात त्यांना मृत्यूचा दिनांक सांगितला होता. तो नंतर इतरांना बरोबर येतो का याची शहानिशा करायला सुचवले होते. लेखातील वर्णनावरून त्यांना ते पहायला खास रस नसावा असे वाटते. मित्राच्या आग्रहामुळे त्यांनी पाहिले. प्रस्तूत लेखकाने त्यांची इच्छा ११० वर्षांनी पूर्ण केली होती! त्यांचा मृत्यू नाडीग्रंथातील दिनांकाशी मेळ बसत नाही असे निदर्शनास आले. मात्र ऑल्कॉट म्हणतात की त्यांनी ज्या पट्ट्या पाहिल्या त्या तेलुगु लिपीत लिहिलेल्या होत्या. केरळात कुंडली ताडपत्रावर मांडून ठेवायची प्रथा आहे. पण ते नाडी भविष्य कथन नसते.

पुण्यातील न्यायाधीश कै. रामचंद्र वझे यांनी त्यांच्या मुलांच्या नाडी पट्ट्या इंग्रजीत कोरलेल्या त्यांच्या संग्रही आहेत. मात्र त्या २ पट्ट्या शिवाय अन्य कोणत्याही केंद्रात तशा पहायला मिळाल्या नाहीत. मुंबईतील छायाशास्त्री बाबुभाई जोशींच्या कडील ताडपत्रावरील लेखन कोणत्या लिपीत आहे यावर चर्चा करायला ते राजी नसतात. पण काही वर्षापूर्वी लिपीतज्ज्ञांनी त्या पट्ट्यातील लिपी कल्याणी व भाषा ओडिसी असावी असे म्हटले.

उत्तर प्रदेशातील प्रतापगढ (अलाहाबाद पासून ५० किमी अंतरावर) येथे भृगू संहितची ३-४ केंद्रात पाली लिपीत पट्ट्या लिहिलेल्या आढळून आल्या. मजकूर संस्कृत भाषेतील असल्याचे २ स्त्री भृगु वक्त्यांनी सांगितले. पंजाबातील होशियारपुर मधील केंद्रातील पट्ट्यातील लिपी देवनागरी असते म्हणून ती सामान्य लोकांना देखील वाचायला येते. पण अर्थवाही वाचायला जमत नाही.

**२. शोध पद्धतीनुसार :** दाक्षिणात्य नाडीग्रंथ स्त्रियांच्या डाव्या आणि पुरुषांच्या उजव्या हाताच्या अंगठ्याच्या ठशावरून विशिष्ट ताडपट्टी शोधायला लागते. तर भृगु संहितेतील फल शोधायला त्या व्यक्तीची कुंडली असावी लागते. तीही बरोबर आहे की नाही याचा शोध मेरठ वासी विपिन कुमार दीक्षित कुंडली शोधन यंत्रावर बसवून त्याची शहानिशा करतात. जेंव्हा कुंडली उपलब्ध नसल्यास व्यक्तीच्या सावलीवरून पट्टी शोधायची पद्धत वापरली जाते म्हणून अशा भृगु किंवा संहिता वाचकांना छायाशास्त्री अशी संज्ञा मिळाली आहे.

**३. लेखनसाहित्यानुसार :** भविष्य कथन ज्यावर केलेले असते त्यासाठी विविध तर्हेयचे लिखाण साहित्य वापरले जाते. भूर्जपत्र - भूर्ज झाडाचे साल, आपण नीरा पितो त्या ताडाच्या झावळ्यांना एकत्र करून रासायनिक प्रक्रिया करून त्यांचे एकसारख्या गठ्ठ्या लेखन केले

जाते. टाक किंवा पेन म्हणून लोखंडी तीक्ष्ण टोकाचा खिळा ताडपत्रावरील मजकूर लिहायला वापरला जातो. तिथे खोडून पुन्हा त्या जागी लिहायला शक्य नसते. म्हणून ती पट्टी पुन्हा एकदा लिहायला लागू नये म्हणून अतिशय काळजीपूर्वक कोरावी लागते. उत्तर प्रदेशात काळ्याकुट्ट लिवलिवीत पट्टीवर शाईत लिहिलेले मजकूर कधी दिसणार नाही इतका अंधुक असतो. तर काही घिसाडघाईने नोंदवल्याचे आढळते. प्राचीन काळी हस्तांतरित, शाळांवर, कातड्यांवर लिहिले जात असे म्हटले जाते. ताडपत्रावरील लेखनाची कार्बन कसोटी करायला सोपी आहे. पण जर्मनीत केलेल्या कसोटी कडे दुर्लक्ष करायचे व स्वतः करायला जायचे नाही असे अडमुठे धोरण अंनिसवाल्यांना वापरावे लागते.

**४. जीव नाड्या :** नाडी भविष्य कथन जीवनाडीतून त्या व्यक्तीशी संवाद असतो. अशा नाड्यांना जीव नाड्या म्हणतात. तिथे अंगठ्याच्या ठशांची गरज नसते. चेन्नईला तांबरम येथील रमणी गुरूजींच्या आश्रमात अशा पद्धतीने काक भुजंदर महर्षींच्या नाडी ग्रंथ पट्टय़ातील मजकुराचे वाचन केले जाते. टी नगर भागात श्री कुमार आपल्याकडील शुक मार्कंडेय नाडीग्रंथ पांढराशुभ्र कोऱ्या कागदावरील मजकूर किंवा झाडाच्या मुळीला हातात घेऊन वाचन करतात. शंकर गुरूजी एकदम बोलायला सुरुवात करतात. तर तंजावर च्या गणेशन यांना कोर्या ताडपत्रावरील मजकूर दिसायला लागतो. नियॉन साईन प्रमाणे तो चमकून पुढे सरकतो असे बहुतेक वाचकांचे म्हणणे पडते. अशा पट्ट्यांना उत्तर भारतात अक्षयपत्र अशी संज्ञा आहे. काही जीव नाडीतील मजकूर शोधायला कवड्या टाकून तर काही ठिकाणी विड्याच्या पानांच्या दानावरून पट्टी शोधतात. साधारणपणे प्रथम जनरल पट्ट्या पाहून झाल्यावर या जीवनाड्यांचे वाचन करावे असा संकेत आहे.

**५. फीज वरून:** प्रत्येक नाडीग्रंथांच्या उपलब्धतेनुसार फीज ठरवली जाते. दुर्मिळ महर्षींच्या उदा रावण, पतंजली, अम्मा, नवग्रह, चंद्रकला – सुर्यकला, कमल, पराशर, वगैरे साठी हजारो रुपयांची रक्कम घेतली जाते. डॉ ओम उलगनाथनजी यांच्या नाडी ग्रंथ कथनातून लाखो रुपयांची तरतूद करावी लागते असे आढळून येते. सध्या फी आकारण्याची पद्धत अनोखी आहे. तमिळ असाल तर समजा ५०० घेतात तर भारतीय गैरतमिळांना १०००,विदेशी लोकांना त्याच्या दुप्पट असे चढे रेट आहेत. शिवाय शांती दिक्षेच्या मेहनतान्यातही नाडी पट्टी तून वाढ झालेली अढळून येते. उत्तर भारतात ५,००० चढावा, सुकामेवा, मिठाई वगैरे सढळ मागितली जाते.

नाडी ग्रंथ प्रकार यापुढेही काळानुसार बदलते राहतील असे कथनातून सूचित केले जाते.

❑❑❑



कामकोटी पीठाधीश शंकराचार्यांची अनोखी भेट मद्रास हायकोर्टाचे जस्टीस कनकराज यांना तमिळमधे नाडी ग्रंथाचे पुस्तक भाषांतरित करायची प्रेरणा दिली. महाराष्ट्रातील नाडी केंद्रांचे पत्ते कसे मिळवता येतील?

मित्रहो, आपल्याला हव्या त्या भागातील ३ नाडीकेंद्रांचे पत्ते पाठवण्यात येतील. अधिक माहितीसाठी आपण ९८८१९०१०४९ वर संपर्क करावा.

# ८. नाडी ग्रंथांचा इतिहास

सामान्यतः इतिहास म्हटल्यानंतर तो वर्षात मोजला जातो. नाडी ग्रंथांची ऐतिहासिकता शोधण्याकरता अनेक प्रयत्न केले गेले. इतिहास हा विविध मार्गांनी, तऱ्हेने शोधायच्या पद्धती आहेत.

एक पद्धत - भाषेवरून. ज्या तमिळ भाषेत हे नाडी ग्रंथ भविष्य लिहिले गेले आहेत त्या मधील शब्द, भाषा, वाक्य, लेखन शैली या बाजूने आणि विविध तऱ्हेच्या त्या भाषेवर झालेल्या आघात किंवा परिणामाया मधून नाडी ग्रंथ भविष्य तील तमिळ कूट भाषा यांचा इतिहास शोधता येतो. अनेक तमिल विचारकांनी अशा तऱ्हेच्या ताडपट्ट्यावरील लेखन हजार वर्षांपुर्वी पासून असेवे असा कयास बांधला आहे.

दुसरी पद्धत म्हणजे कार्बन कसोटी. ज्या ताडपत्रावर, पट्टयांवर हे ग्रंथ कोरून लिहिलेले आहेत, त्या ताड पट्ट्यांचा शास्त्रीय प्रयोगशाळेत कार्बन कसोटी करून त्यावरून ताडपट्टीचे ऐतिहासिकत्व शोधता येते का ते पहाणे. जर्मनी मधील रॉझेनडॉफ प्रयोगशाळेत तेथील सरकारी दस्तावेजांचे वयोमान शोधायचे कार्य चालते तेथे एका नाडी ग्रंथ पट्टीचे सँम्पल तपासले गेले त्या पट्टीचे वय साधारण तीनशे पन्नास पुढेमागे पन्नास धरून ३शे ते ४शे असावे असा निर्णय दिला.

तिसरी पद्धत म्हणजे महर्षींचे ऐतिहासिकत्व. ज्यामहर्षींनी हे लेखनाचे कार्य केले त्या महर्षींचे इतर ग्रंथांतून केले गेलेले उल्लेख. त्या उल्लेखांतून त्या महर्षींच्या अस्तित्वाचे पुरावे मिळवून त्यांचा शोध घेणे. उदा. अगस्त्यमुनि किंवा महर्षींचा आश्रम पंचवटी - नाशिक जवळच्या अकोले या येवल्याजवळ असलेल्या डोंगरकपारीत असल्याचे रामायणात म्हटले गेले आहे. इतर काही महर्षी वसिष्ठ - रामाचे व त्यांच्या चांद्रकुळाचे मुख्य धार्मिक गुरू असल्याचे म्हटले जाते. रावण नाडी मधून रावणाच्या नावाचा उल्लेख हा रामाणातील घटनांशी संबंध दर्शवतो. रामायण (जर ते घडले आहे असे मानले तर, साधारणतः ७५०० वर्षांपुर्वी घडले अथवा लिहिले गेले असावे असा तज्ज्ञांचा निर्वाळा आहे). या शिवाय विविध अन्य नाडी महर्षी उदा. कौशिक उर्फ विश्वामित्र, शुक्राचार्य, मार्कंडेय, काकभुषुंड वगैरे नावे विविध महाभारत, भागवत व अन्य १८ पुराणातून उल्लेखलेली येतात.

चौथा पद्धत खुद्द नाडीमहर्षींच्या कडून माहिती मिळवणे. हा प्रकार असा की नाडी महर्षी देखील त्यांच्या लेखनाचा उल्लेख द्वापार युगापासून सुरू आहे असा करतात. अशा तऱ्हेचे नाडी ग्रंथांची ऐतिहासिकता तपासताना काही संदर्भ मिळतात का याचा शोध काही नाडीप्रेमींनी प्रश्न कांडम मधून विविध नाड्यांच्या ताडपट्ट्याविषयी त्या पट्या केंव्हा लिहिलेल्या गेल्या, अशी विचारणा केली. सन २००८ मधे पुण्याच्या पिंपरी नाडीकेंद्रात महर्षी अत्री जीव नाडीत असाच प्रश्न केला गेला त्यात कलियुगाची सुरवात केंव्हा झाली असे प्राथमिकपणे विचारले गेले त्यावर महर्षींनी उत्तर दिले की हे उत्तर सांगायच्या आधी गणितयंत्र (कॅलक्युलेटर) हातात घ्यावे कारण त्याची गरज तुम्हाला पडेल. त्या नंतर त्यांनी तमिलमधे एक सूत्र सांगितले - ते असे (....)त्याचा मराठीत अर्थ असा कि राशींचा संख्येत, ग्रहांची संख्या यांना शंभर सहस्रांनी गुणावे. तर एकवीस लाख इतकी संख्या येईल. (१२ राशी+ ९ ग्रह = २१ * १,००,०००= २१,००,०००) हे एकवीस लाख म्हणजे

काय? हा प्रश्न पडेल. हे दिवस आणि रात्र याचे गणित आहे. म्हणून २१ लाख दिवस. त्याला महिन्यात मोजण्यासाठी ३० ने भागले तर त्याचे ७० हजार महिने येतात. त्याला १२ ने भागले तर ५८३३ वर्षे येतात. इतकी वर्षे कालियुगाला झाली असे याचे उत्तर येते. या पुढे जाऊन विचारलेले गेले की या पट्या लिहायला किती अवकाश लागला असावा. त्यावर उत्तर देण्य़ाआधी म्हटले की हे प्रश्न विचारणाऱ्यांनो, तुम्ही उपस्थित नाडीप्रेमी, आमच्या नाडी ग्रंथांवर अपार श्रद्धा बाळगणारे आहात. आमच्या नाडीग्रंथांचे वैयक्तित व सामुहिक अनुभव घेऊन ते मिथ्या नाहीत असे निश्चयपुर्वक मानता, असे म्हणून सांगतो. कारण एरव्ही आमच्या या कथनाची चेष्टा व टिंगल केली जाण्याची शक्यता आहे. तरीही तुम्ही हा प्रश्न आत्मियतेने विचारता आहात म्हणून तुमचे समाधान करायसाठी सांगतो की आमचे याबाबतचे कथन इतके अशक्यप्रायः आहे की तुम्हाला देखील बुचकळ्यात पाडून, असे कसे काय शक्य आहे? अशा मानसिक पेचात पाडेल.

❑❑❑

## निश्कलंक महादेवांचे दर्शन



महादेवाच्या पिंडीपाशी दुग्धाचा अभिषेक झाल्यावर, मागे दूरवर समुद्र

नाडीपट्ट्यातून फक्त दक्षिणेतील मंदिरांना भेटी द्यायला सांगितले जाते असे अनेकांना वाटत राहते. ते तसे नसते. अनेकदा उत्तरभारतातील प्राचीन स्थानांचा उल्लेख कसा येतो ते यावरून स्पष्ट होईल. गुजराथ राज्याच्या सौराष्ट्रातील भावनगर शहराच्या पासून २५ किमी दूर कोलियाक बंदरात निष्कलंक महादेवाच्या पाच पिंडी फक्त ओहोटीच्यावेळी समुद्राच्या पाण्यातून पोहोचायला वाट करून देतात. त्या काही तासातच ते दर्शन शक्य असते. अन्यथा ते स्थान समुद्राच्या पाण्यात बुडलेले असते. पाच पांडवांनी तिथे पुजाकरून आपल्या मनांतील युद्धात केलेल्या मानवहानीमुळे कलंकित झाल्याची भावना दूर करायला पुजन केले. अशी आख्यायिका आहे. मला तिथे जायचा आदेश महाशिवनाडीच्या कथनातून केला गेला. त्याठिकाणी पुजा करायचे साहित्य न्यायचे असते. याची कल्पना नसल्याने रिक्त हस्ते जाणे झाले. परंतु तिथे साधनेला बसल्यावर आपल्याकरिता अन्य भाविकांनी दुधाचा, गोड्यापाण्याचा अभिषेक, बेलाच्या पत्रांचे अर्पण हे माझ्याकडून त्यांच्या हाताने होत आहे. असा भाव जागृत झाला. तर्पणासाठी पुन्हा तेथून दूर २ किमी समुद्रात जाणे झाले. याच यात्रेत अहमदाबादमधील नाडी केंद्रातून वर्षोनवर्षे रखडलेले तमिळ टायपिंगच्या करेक्शनचे काम विनायास पुर्ण झाले.

# ९. काटेबारसच्या नवनाथ कुंभार यांची ओळख आणि त्यांचे अद्भूत अनुभव





Figure 1 जीर्णोधारानंतरचे भव्य शिव मंदिर



जग प्रसिद्ध यात्रा काटे बारस पाहण्यासाठी बांधलेले स्टेडीअम गुळुंचे

**१ जीर्णोधारानंतरचे भव्य शिव मंदिर**

(एक रोमांचक व थरारक 'काटेबारस'. हरहर महादेव व हरभोलेच्या निनादात सारा आसमंत दणाणून जातो व या निनादातच अंगात आलेला भक्तगण बाभळींच्या जुनाट काटेरी फेसांमधे पाण्यात सूर मारावा तशा पद्धतीने लोळण घेतो व आपली श्रद्धा व्यक्त करीत असतो. अशा भक्तगणांची संख्या जवळजवळ ८०-९० च्या घरात असते. प्रत्येक उडीला त्या भक्तांचा उत्साह दुणावत असतो. त्यानंतर हा भक्त मंदिरात जातो. मंदिरातील गुरव या भक्तगणांच्या अंगावर विभूती टाकतात. विभूती टाकल्यानंतर हा भक्तगण पूर्वस्थितीवर येतो. त्यावेळेस त्याला कुठलीही वेदना होत नसते किंवा जखम झालेली नसते. अशा प्रकारे अनेक भक्तगण आपली शिवभक्ती व्यक्त करीत असतात. प्रत्येक भक्तगणांचा भाव वेगवेगळा असतो व उत्कंठा वाढविणारा असतो. ही थरारक यात्रा पाहून भाविकांच्याच अंगावर शहारे येत असतात. एक प्रकारचे आध्यात्मिक चैतन्यच निर्माण झालेले असते.)

माझे नाव नवनाथ कुंभार, वडिल- निवृत्ति; आई- मुक्ताबाई. माझा जन्मच झाला तो मुळी गरीब घराण्यात. सर्वात धाकटा मी; माझ्याआगोदर दोन मोठ्या बहिणी. आमच्या उदरनिर्वाहाचं साधन म्हणजे बलुतेदरी. बारा बलुतेदारी ही पद्धत गावाकडं अजूनही टिकून आहे. कुंभारकाम हा आमचा परंपरागत व्यवसाय. यातून

फार काही मिळत नसले, तरी पोटापुरते मिळण्यास काही अडचण नव्हती. त्यात धान्य मिळण्याचे प्रमाण अधिक, तरी पण तेलमिठाचा प्रश्न असायचाच. आलेलं धान्य विकून तो भागवायचो. कधी कधी त्यासाठी आईवडीलांना मोलमजुरी करावी लागायची. गावातच शाळेची सोय असल्यानं प्राथमिक व माध्यमिक शिक्षण तेथेच पूर्ण झालं. माझं शिक्षण चालू असतानाच दोन्ही बहिणींची मंगलकार्ये पार पडली. नोकरीसाठी प्रयत्न चालू होते.

माझी नाडीग्रंथ भविष्याची ओळख झाली ती विंग कमांडर शशिकांत ओक सरांच्या १९९८ च्या ग्रहांकित दिवाळी अंकातील दैवी मार्गदर्शक नाडी ग्रंथ रचना या लेखामुळे. कित्येक दिवस ते पुस्तक माझ्या संग्रही होते, परंतु नाडीभविष्य म्हणजे कसली ती हाताची नाडी तपासून भविष्य सांगणार या गैरसमजातून तो लेख वाचनात नव्हता. नंतर मे २००४ मधे नाडीवाचक श्री .विजयकुमार स्वामी यांची मुलाखत असलेला लेख वाचण्यात आला. त्यात श्री. विजयकुमार यांचा संपर्क क्रमांक होता. तो वाचून माझी नाडी भविष्य पहाण्याची इच्छा अजूनच तीव्र झाली. त्याला कारणही तसेच होते. आमच्या गावातून त्यावेळेस कांद्याचे ट्रक लासलगावला कांदा भरुन जायचे. ट्रक मालक ओळखीचा असल्याने त्यांना विनंती केली व मी नाशिकला पोहोचलो. त्या भविष्यकथनातून जीवनाला दिशा मिळाली....एक वेळ अशी होती की सर्वच मार्ग बंद पडले असताना केवळ महर्षींच्या कृपाशिर्वादाने माझी जीवननौका नुसतीच तरली नाही तर तिने योग्य वेळी वेगही घेतला. आतापर्यंतची महर्षींनी वर्तवलेली सर्व भाकिते खरी ठरली तर पुढील काळातील भाकितेही खरी ठरणार यात शंकाच नाही. मी आज समाधानी वृत्तीने जीवन जगत आहे. गोदरेज कंपनीचे काम सोडून सध्या वास्तू कन्सल्टंटचे काम करीत आहे. पत्नीही सरकारी सेवेत आहे. मुलांचे शिक्षण चालू आहे. दरम्यानच्या काळात या शास्त्राशी बर्यूपैकी ओळख झाली. गावातील बर्यातच लोकांना याबाबत मार्गदर्शन केले. याच माध्यमातून विंग कमांडर श्री. शशिकांत ओक सरांशीही ओळख झाली व त्याचे रूपांतर मैत्रीत झाले. त्यांना आम्ही या शास्त्रातील गुरुच मानतो. नाडीग्रंथावरील त्यांची पुस्तके वाचण्यात आली, यातून बरेच काही घेण्यासारखे आहे याची जाणीव झाली. त्यांच्याकडून महर्षी अत्रींच्या अद्भूत जीवनाडीची माहिती मिळाली. आमच्या ग्रामदैवतेच्या यात्रेविषयीची माहिती जीवनाडी मिळते का त्याची उत्सुकता लागुन राहिली व त्याबाबतचा दिव्य अनुभव आम्हाला मिळाला. २८ फेब्रुवारी २००६. जीवनातील एक संस्मरणीय दिवस. नाडीसंहितेच्या अत्री जीव नाडीच्या माध्यमातून आमच्या गुळुंचे गावच्या श्रीज्योतिर्लिंगाच्या आगळ्या-वेगळ्या काटेबारस यात्रेबद्दल ऐतिहासिक व पौराणिक माहितीसाठी जिज्ञासू वृत्तीने प्रयत्न चालु केलेला. २८ फेब्रुवारीच्या अगोदरही आम्ही जीवनाडीच्यासाठी वेळ ठरवलेली, परंतु महर्षींच्या आदेशाप्रमाणे दहा दिवसांनी पुन्हा येण्यासाठी नाडी वाचकांनी सांगितले, त्याप्रमाणे ठरलेल्या दिवशी दुपारी साडेतीन वाजता मी व माझ्याबरोबर दोन मित्र गेलेलो. तसे पाहिले तर आम्ही सर्वजण या क्षेत्रात नवीनच. तेथे गेल्यावर नाडीकेंद्रातील नाडी वाचकांनी या अत्री जीवनाडी बद्दलची माहिती सांगितली व कवड्यांचे दान टाकण्यास सांगितले. हे दान टाकण्यापूर्वी कुलदेवतेचे नामस्मरण व इष्टदेवतेचे नामस्मरण करण्यास सांगितले. त्यानुसार मी श्रीतुळजाभवानी माता व श्रीज्योतिर्लिंगाचे स्मरण करुण दान टाकले. त्यानुसार जे दान पडले त्याप्रमाणे जी पट्टी निघाली ती वाचण्यास प्रारंभ केला. मला प्रथम तुमचा

प्रश्न काय आहे असे विचारल्यानंतर मी आमच्या 'काटेबारस 'यात्रेबद्दलचा प्रश्न विचारला असता जीवनाडीतील पट्टीत महर्षि अत्री व मात अनसूया यांचा जो संवाद झाला तो पुढीलप्रमाणे:-

आज आपल्यापुढे फारच महत्वाचा माणूस प्रश्न घेऊन आलेला आहे. हा प्रश्न त्याचा वैयक्तिक नसून तो समाजकार्यासाठी हा प्रश्न घेऊन आलेला आहे. प्रश्न खूपच महत्त्वाचा आहे. माझ्याकडे येणारा प्रत्येक जण काही न काही प्रश्न आपल्या स्वार्थासाठी विचारतात पण हा धार्मिक सेवेचा प्रश्न आहे. त्याच्या मनात अजूनही खूप प्रश्न आहेत ते सर्व प्रश्न त्यांकडून विचारुन घेण्याचा आदेश त्यांनी नाडी वाचकांनी दिला व त्या सर्व प्रश्नांची समाधानकारक उत्तरे देण्याचे आश्वासनही दिले. त्यानुसार मी माझ्याकडे असलेल्या सर्व प्रश्नांवर महर्षींनी माता अनसूयेस सांगितले की येथील श्रीज्योतीर्लिंगाचे जे देवस्थान आहे ते स्वयंभू असून त्याबद्द्ल जी माहिती यांनी विचारली आहे ती माहिती यांना त्यांच्याच गावातील ६९ वर्षाचा ब्राह्मण देईल. त्या ब्राह्मणाबद्दलची यथोचित माहितीही त्यांनी सांगितली, त्याच्या घराची वास्तूरचना सांगितली व त्या ब्राह्मणाकडे जाऊन त्यांना पान, सुपारी व वस्त्रदान करुन त्यांना हे सर्व प्रश्नांची माहिति विचारली असता तो जे उत्तर देईल ती उत्तरे तुमच्या प्रश्नांची उत्तरे असतील. ग्रामदेवता त्या ब्राह्मणावर प्रसन्न असल्याचे त्यांनी नमूद केले. यावर अनसूया मातेने महर्षींना प्रतिप्रश्न केला की, स्वामी, हे लोक तर आपल्याकडे आलेले आहेत, असे असताना आपण त्यांना दुसर्या कडे का पाठविता आहात? महर्षींनी उत्तर दिले की, या देवस्थानाबद्दलची माहिती सांगण्याचा अधिकार फक्त त्या ब्राह्मणालाच आहे. माझ्या हातून हे काम होणार नाही. त्याच ब्राह्मणाला त्यांनी गाय देण्यास सांगितले. तसेच ग्रामदेवतेस गाय व बछडा सोडण्याची सूचनाही त्यांनी केली.

आमच्या पुढील प्रश्नाप्रमाणे त्यांनी मंदिर मंड्लाच्या जीर्णोद्धाराच्या द्रुष्टीने काही सूचना दिल्या त्या अशा की, यापुढे हे मंदिर फार मोठे मंदिर होणार असून आगामी काळात या मंदिरास यात्रेस जागतिक पातळीवर प्रसिद्धी मिळणार असून येथे येणार्या प्रत्येक भाविकाचे कल्याण झाल्याशिवाय राहणार नाही. लवकरच या मंदिराच्या जीर्णोद्धाराचा शुभारंभ होणार असून या पुनर्निर्माणासाठी १०८ लोकांचे ट्रस्ट करुन तुम्ही येथे आलेले लोकही या ट्रस्टचे मेंबर होणार असल्याचे सूचित केले. याच पुनर्निर्माण कार्यासाठी महर्षींनी स्वतः पहिली देणगी होनच्या रुपात (आताचे १०१/- रु) व पानसुपारी देणार असल्याचे सांगितले. तसेच या देवतेच्या वार्षिकोत्सवातही मोठ्या प्रमाणात वाढ होणार असल्याचे सांगून पूज्य महर्षी अत्री व माता अनसूया यांचा संवाद अंतर्धान पावला.

वरील प्रकारचा अनुभव हा एक दिव्य अनुभव असल्याने आम्हाला अतुलनीय आनंद झाला. जीवनाडीतील आदेशाप्रमाणे तेथील नाडीवाचकांनी आम्हांस पानसुपारी देणगी रु १०१/- श्रीफल, वस्त्र व फळे देऊन उत्तमरित्या आदरातिथ्य केले. अशा प्रकरचा आदेश नाडीवाचकांना पहिल्यांदाच आल्याचे नाडीकेंद्रचालक श्री. ईश्वरन् यांनी कबूल केले व या देवस्थानाला लवकरच भेट देण्याचे निश्चित केले व आम्हाला निरोप दिला. आम्ही जे प्रश्न ग्रामदेवतेविषयी विचारले ते व उत्तरे पुढीलप्रमाणेः

१) या गावाच्या ग्रामदेवतेची काटेबारस यात्रा कधीपासून सुरु झाली?

साधारणतः सन १६७६ पासून म्हणजे जवळ-जवळ ३०० वर्षांपासून, छत्रपतींच्या काळापासून ही यात्रा सुरु झाल्याचे त्यांनी सांगितले. त्यास दुजोरा म्हणून

त्यांचेकडे उपलब्ध असलेले २७७ एकर जमिनीचे बक्षिसपत्र व त्यावर असलेली तारीख कार्तिक शु. दशमी शके १६५१ दाखवले आणि या यात्रेची सुरुवात केली ति दांगट लोकांनी असे सांगितले.

२) अनेक ठिकाणी श्रीशंकराची यात्रा महाशिवरात्र किंवा श्रावण महिन्यात होत असते. परंतु या ठिकाणची यात्रा कार्तिक महिन्यात शुद्ध द्वादशी या तिथीला होत असते या तिथीचे महत्त्व काय?

हरि व हर यामधे भेद नाही. कार्तिक महिना हा श्रीविष्णू व श्रीशिव या दोघांनाही प्रिय आहे. याच महिन्यात वैष्णवांच्या महाएकादशी असतात. कार्तिक मास हा सर्व तीर्थ आणि यज्ञ यापेक्षा आधिक पवित्र असल्याचे स्कंद पुराणात म्हटले आहेत.

३) श्रीज्योतिर्लिंगाबरोबर इतर दैवतांचा संबंध काय? या ठिकाणी श्री गंगामाता व श्री पार्वतीमाता यांचेही वास्तव्य आहे. त्यांचीही प्रतिके याठिकाणी आहेत.

मंदिरात पूर्वीपासून १२ दिवस लोक उपासना करतात. पूर्वीपासून कीर्तन फक्त एकादशी दिवशी किन्हईचे हरिदास बुवा यांचे होते. त्यापुर्वी फक्त भजन होते. १९७४ साली याच ब्राह्मणांच्या कानात घटस्थापनेदिवशी अनाहत नाद एकू येऊ लागला आणि त्यानंतर त्यांनी सेवा करण्यास सुरुवात केली. १२ दिवसांच्या उपासना काळात श्रीज्योतिर्लिंगाचा छबिना निघतो. ठिकठिकाणी आरत्या होतात. त्यात प्रामुख्याने आतील गाभार्याजत श्रीशंकराची, मंडपात श्रीरामाची, श्रीगणपतीची, श्रीविठ्ठलाची, श्रीतुलसीमातेची, श्रीरामदासांची, श्रीदेवीची, श्रीतुकाईदेवीची, श्रीमारूतीची, श्रीबोल्हाईची, श्रीत्र्यंबकेश्वराची व नंतर मंत्रपुष्पांजली. या बारा दिवसांच्या काळात रोज लघुरुद्र (अभिषेक) तसेच रोज झेंडूच्या फुलांची माळ अर्पण करण्यात येते. कलश ते लिंगापर्यंत. या झेंडूच्या माळांची सर्व फुले एकत्र केली जातात. व ती फुले ताटात घेऊन काटेबारस दिवशी श्रींच्या सोबत घालवीत नेतात. मानाच्या काठीला परत घेऊन आल्यानंतर बाभळीच्या काट्यांना ज्या ५ प्रदक्षिणा घालतात त्या पूर्ण झाल्यानंतर हे सर्व काटे मंत्रभारित होतात. व हीच फुले मागील वर्षाचा जो भस्म (काटे जाळून टाकल्यानंतर) आहे त्यात मिसळतात. भक्तगण काटेमोडवण करून आल्यानंतर जी विभुति गुरव टाकतो तेच हे भस्म.

एक वर्ष उलटल्यानंतरही अजून जिर्णोद्धाराच्या कामाचा शुभारंभ काही होत नव्हता. आम्हीही अजून धीर सोडला नव्हता. या कामी पुन्हा काही आदेश येतो का ते पाहण्यासाठी दि २१/०८/२००७ महर्षींकडे गेलो. या जीर्णोद्धराच्याकामी कुठल्या राजकीय पक्षाची मदत होईल असा प्रश्न विचारला असता घड्याळाच्या चिह्नाच्या पक्षाची मदत होईल असे उत्तर आले. नंतचा प्रश्न होता तो ज्या लोकांनी यात्रेची सुरुवात केली त्याच्या माहितीसाठी विचारला. यावर कुंभाभिषेक केल्यानंतर याचे उत्तर आपोआप मिळेल असे उत्तर आले. ते लोकही परत येतील असेही सांगितले. पुढील प्रश्न होता तो भवानी तलवारीबद्दलचा, जी परदेशात म्युझियममध्ये आहे. त्यावरचे महर्षींचे उत्तर असे होते, छत्रपती शिवाजी महाराज हे महापुरुष या महाराष्ट्रात होऊन गेले. फार मोठे शौर्य त्यांनी गाजविले. या शौर्याची आठवण म्हणून ही तलवार तेथेच राहिली पाहिजे. तलवार म्हणजे भवानीमातेचा आशिर्वाद आहे. छत्रपतींच्या नावाचा जगात प्रचार व प्रसार झाला पाहिजे. अशी भवानीमातेचीच इच्छा असून ती परत येणार नाही असे उत्तर आले. पुढचे दोन प्रश्न माझे वैयक्तिक स्वरूपाचे होते.

यानंतर बरोबर एक वर्षानंतर, ज्या लोकांचा या जीर्णोध्दराच्या कामाकडे कल होता त्यांच्याकडे

सूत्रे गेली. व त्यांच्या सहकार्याने काम जोरात सुरु झाले. २००८ सालच्या पहिल्याच सोमवारी जीर्णोद्धाराचा शुभारंभ झाला. याकरीता साधारणतः ५ कोटी ७५ लाख रुपयांचा आराखडा तयार करण्यात आला. प्रामुख्याने मंदिराच्या प्रवेशद्वाराचा परिसर, मंडपासह आतील परिसर व यात्रेचा मुख्य सोहळा पहाणेसाठीचे भव्य स्टेडियम याचा समावेश आहे. त्याप्रमाणे मंडपाचे काम पूर्णत्वास गेलेले असून स्टेडियमचे कामही जवळ-जवळ पूर्ण झाले आहे. कामात अजुनही छोट्या छोट्या तांत्रिक अडचणी येतात. परंतु बाबांच्या आशिर्वादाने त्याही दूर होतात.

एकदा अत्रीमहर्षींना शेवटचा प्रश्न विचारल्यानंतर आदेश आला तो श्री. ईश्वरन् यांना, की त्यांना व मला मिळून एक मंगलकार्य आज करायचे आहे. आम्ही लोकांनी जे जीर्णोद्धाराचे कार्य हाती घेतले आहे त्या कार्यासाठी रु. ५,०००/- ची देणगी आपल्याकडे आलेल्या व्यक्तीला देऊन त्याचाही गौरव वाढवायचा आहे. त्याप्रमाणे श्री. ईश्वरन् यांनी ताबडतोब खिशातून ५ हजार रुपये काढून माझ्याकडे सुपूर्द केले. मीही लगेच ते दुसर्यात दिवशी सोमवारच होता, त्यादिवशी गावातील या कामी पुढाकार असलेल्या व्यक्तीकडे घडलेल्या घटनेसह सांगून सुपूर्द केले. त्यानंतर दुसर्यातच आठवड्यात दर्शनाला गेलो असता मा. सुप्रिया सुळे व श्री. अजितदादा पवार यांच्या फंडातून याच कामासाठी १० लक्ष रु. चा फंड उपलब्ध झाल्याचे समजले. यावरून महर्षींची किती कृपा आमच्यावर आहे ते लक्षात येते. सध्या येथील कामेही वेगात सुरु आहेत. काही तांत्रिक अडचणींना त्यांच्या आदेशाप्रमाणे काही उपाय करण्याचे बाकी आहे. परंतु नजिकच्या काळात तेही आम्ही पूर्ण करणार अशी खात्री आहे. (ताकः पंतप्रधान नरेंद्र मोदींच्या आवाहनानुसार राज्यसभेचे सदस्य श्री. अशोककुमार गांगुलींनी गुळुंचे गाव विकासासाठी दत्तक घेतले आहे.)

मी वयाच्या २८ व्या वर्षी पहिल्याप्रथम अगस्ती नाडीचे अवलोकन केले त्याला दहा वर्षापेक्षा जास्त काळ लोटला. या काळात महर्षींनी दिलेले उपाय चालू ठेवले. त्यानुसार त्यांनी वर्तवलेली भविष्येही तंतोतंत खरी ठरली. अनेक लोकांना माझे अनुभव सांगून त्यांनाही अडचणीत मार्गदर्शन करून नाडीपट्टीचा अनुभव घेण्यास सांगितले. गावातील बर्यामच लोकांनी अगस्ती नाडीचे अवलोकन केलेले आहे. त्याबाबत ते समाधानीही आहेत. फारच अडचणीच्या काळात महर्षी अत्रींच्या जीवनाडीचे करावे तितके कौतुक अपुरे आहे. कुणाला कुणाला त्यांनी कुठलीही दक्षिणा न घेता मार्गदर्शन केलेले आहे. माझ्या कंपनीतील सहकारी मित्राचा मित्र घरातून अचानक बेपत्ता झाला होता. त्याचे आईवडिल अतिशय चिंतेत होते. एकच मुलगा तो ही बेपत्ता असं म्हटल्यावर कुठल्या आईवडिलांना गप्प बसवेल. अनेक उपाय झाले परंतु पत्ता काय लागत नव्हता. मला एकदा त्याने याबद्दल विचारले असता मी सरळ अत्रिजीव नाडीचा अनुभव घेण्यास सांगितले तसे त्यानी ईश्वरन् यांच्याशी संपर्क साधला. फक्त तीनच प्रश्नात त्यांनी हा महत्त्वाचा प्रश्न निकाली काढला होता. मुलाच्या वयाइतके दिवे कुलदेवतेस लावण्यास सांगुन ४८ दिवसांच्या आत तो परत येईल असे सांगितले त्यानुसार तो परत आला देखील.

❑❑❑

# १०. नाडी ग्रंथ भविष्यातील उपाय व तोडगे.

नाडी ग्रंथातून आपल्या सध्याच्या संकटांवर, पुर्व जन्मातील पापकृत्यांवर मात करायला काय उपाय तोडगे सुचवलेले असतात? त्याचे १३ व १४ क्रमांकाच्या कांडातून त्याचे मार्गदर्शन कसे होते? यावर मार्गदर्शन नाडी भविष्यात व्यक्तीच्या पुढील आयुष्यातील घटनांचा उल्लेख करण्यात येतो. त्याच्या अंगठ्याच्या ठशाचे वर्णन केले जाते. त्या ठशावरून त्याची ताडपट्टी शोधली जाते. त्य़ात त्याचे व अन्य नातलगांची नावे कथन केली जातात. नंतर त्याने केलेल्या पूर्वजन्मातील पाप-पुंण्याच्या कर्मातून निर्माण होणाऱ्या परिणामांमुळे त्याला भोगायला लागणाऱ्या कष्टांची, त्रासाची झलक सांगितली जाते. शिवाय शांती परिहार या - १३ क्रमांकाच्या व दीक्षा परिहार - १४ क्रमांकाच्या कांडातून सुचवलेल्या उपायांनी, तोडग्यांनी त्या कष्टांचे, त्रासांचे परिमार्जन होऊन बाधा दूर होतील, नवे मार्ग, नव्या कल्पना, संधी उपलब्ध होण्यास मदत होईल असे महर्षी सुचवतात. सामान्यपणे असे म्हणता येईल की बाहेर पाऊस पडत असेल तर तो थांबवण्याची क्षमता आपणात नसली तरी छत्री उघडून हवे तर आपण आपले संरक्षण करु शकतो. ते आपल्या हातात असते. तसेच काहीसे नाडी ग्रंथ भविष्यकर्ते महर्षी शांती दीक्षेचे उपाय व तोडगे सुचवून आपले मार्गदर्शन करतात.

**शांती परिहार**

या मधे काही मंदिरात जाऊन पुजा-अर्चना करायला सुचवले जाते. सुचवलेल्या वारी व दिवशीच मंदिरीत जाणे महत्वाचे असते. मंदिरातील कोणत्या मूर्तीस अर्चना करायला सांगितली आहे याची तत्परतेने नोंद करणे आवश्यक असते. कारण काही वेळा त्याच मंदिरातील मुख्य मुर्तीच्या ऐवजी अन्य देवतेला करायला सुचचवलेली पुजा धादरटपणामुळे वा योग्य मार्गदर्शनाच्या अभावामुळे होत नाही. वेळ व पैसे याचा अपव्यय होतो. आपण योग्य शांती-दीक्षा करून आलोय असे वाटत रहाते.

नाडी भविष्य पाहून झाल्यावर शक्यतो तेंव्हाच किंवा शक्य तितक्या लवकर मंदिरांना भेटी वा पुजा कराव्यात. कारण पुन्हा तितके दूर जाणे होतेच असे नाही. शुचिर्भूत होऊन मंदिरात शक्यतो उपवास करून सकाळी पोहोचावे. तेथील ऑफिसमधून पुजेच्या पैशाची पावत फाडावी. मंदिरात गाभाऱ्यात पोचल्यावर समोरील मुर्तीकडे भावनिकतेने न्याहाळावे. अन्य लोकांशी संभाषण टाळावे. मंदिरपरिसरातील अस्वच्छता, ओल, थंड जमीन, भाषेचा दुरावा, न समजणाऱ्या भाषेतील कर्कश्य गाण्यांचा मारा यामुळे मन विचलित न होण्यासाठी मौन व्रत करून मूर्तीवर मन रमवावे. जप करत रहावे.

पुजाऱ्याजवळ जाताच आपले नाव, वडिलांचे नाव, गोत्र, नक्षत्र आदि तत्परतेने सांगावे. त्य़ासाठी एका कागदावर ती नोंद तयार ठेवावी. अन्य कोणा व्यक्तिसाठी अर्चना करायची असल्यास त्याच्या भल्यासाठी मनातून प्रार्थना करत मंदिरात प्रवेश करावा. पुजा साहित्य खिशाला परवडेल असे घ्यावे. अर्चना कांडात सुचवल्याप्रमाणेच व सुचवलेल्या क्रमानेच करावी. कधी कधी दोन जवळच्या वागावे. सर्व पुजा संपल्यानंतर

नाडी केंद्रात जाऊन तेथील महर्षींच्या फोटोस फळे, फुले, कापड व गोड पदार्थांचे नैवेद्य वगैरे सोपस्कार करावे लागतात. काही दक्षिणा देण्यास महर्षींनी सुचवलेले असते. ती जरूर द्यावी. ती देत असताना खरोखरच ती द्यावी असा उल्लेख आहे कि नाही की हे नाडी शास्त्री पदरचे वाक्य घालून पैसे उकळण्याचे धंदे करत आहेत आदि संभ्रम बाळगू नयेत. या संभ्रमाचा साक्ष मोक्ष आधीच लावलेला असावा.

अनेक लोक मला विचारणा करतात कि खरे काय? अशांना सांगावेसे वाटते की मी स्वतः त्या नाडी पट्ट्या वाचून त्यामधे अमुक अमुक असे पैसे द्यावेत असा उलेख असतो याची खात्री करून घेतली आहे. तरीही प्रत्येकाने खात्री करून मगच दक्षिणा देण्य़ाचे ठरवावे. म्हणजे प्रत्यक्ष दक्षिणा देताना मानसिक शांती ढळणार नाही.

**दीक्षा परिहार**

कुटुंबाचा उत्कर्ष सहन न झाल्याने, दुष्ट लोकांच्या वाईट कारवाया चालू, त्यामुळे घरात कटकट, त्रास, वैताग, कोणी ना कोणी नेहमी आजारी पडून अतोनात पैसा खर्च होणे, योग्य त्या संधी आल्या तरी ऐन वेळी त्या हुकणे, विवाह, कोर्ट यामधून घराची शांती ढळणे आदी उपद्रवी कारणांसाठी नाडी महर्षी जप करण्यासाठी मंत्र सुचवतात. कधी पंचाक्षरी तर कधी नवाक्षरी. लक्ष्मीचा तर कधी गणेशाचा वा अन्य देवतांचा. रोज १०८ मंत्राच्या १०८ माळा अशा २-३ मंडले (एक मंडल ४८ दिवसांचे) करणे आवश्य़क असतो. तो जप आपण करावयाचा असतो. पण रोजच्या रहाटगाडग्यातून वेळ काढून इतका वेळ न मिळाल्याने वा तन्मयतेने, तत्परतेने जपजाप्य करणे शक्य नसते. म्हणून नाडीशास्त्री तो जप त्यांच्या लोकांकरवी करायचे मान्य करतात. त्यासाठी त्यांना मेहनताना म्हणून काही ठराविक रक्कम दररोजच्या बोलीने द्यावी लागते (आज काल रोजचे रु दीडशे ते दोनशे असे साधारण घेतात. पुजासामान व जपकरणाऱ्याचा मेहनताना विचारात घेता ही रोजरक्कम अवाजवी वाटत नाही) तो मंत्रजाप एका जागी, शिवाच्या वा अन्य सुचवलेल्या मुर्तीसमोर नारळ, हार, फुले अन्य पुजा सामुग्रीसह केला जातो. केंद्रात पैसे जमा केल्यास मंडलांची पुजा व जप झाला की पोस्टाने मंत्रित तावीज पाठवला जातो. तो तावीज जातकाने शरीरावर धारण करणे आवश्यक असते. त्या आधी घरातील देवांबरोबर पुजा करून, चांगला मुहूर्त पाहून तो गळ्यात किंवा दंडावर धारण करावा. उरलेली रक्षा जपून ठेवावी. कधी तावीज हरवला, वापरून खराब झाला तर चांदीच्या पेटीत उरलेल्या रक्षेतील थोडी रक्षा घालून नवा तावीज धारण करावा. त्यामुळे जीवनातील कटकटी दूर होण्यास मदत होईल. जीवनात इच्छित शांतता लाभून मन संतुष्ट राहील.

❒❒❒

# ११. नाडी ग्रंथ प्रेमींचे अदभूत अनुभव

**कौस्तुभ बुटालांची नाडीमहर्षींची सेवा :** श्री हिराभाई बुटालांचे सुपुत्र कौस्तुभ एक तरूण उद्योजक आणि प्रखर नाडी ग्रंथ प्रेमी आहेत. अत्यंत भीषण कार अपघातातून सही सलामत सुटून पुन्हा पुन्हा नव्याने आयुष्याला सुरवात करायला महर्षींचे मार्गदर्शन त्यांना वेळोवेळी प्रेरणादायी ठरते. मुंबईतील छायाशास्त्री हर्षदभाई यांच्या सूर्यसंहितेचे ते विशेषत्वाने चाहते आहेत. भवानीमातेच्या आशीर्वादाने व महर्षींच्या आशीर्वादाने त्यांनी प्रतापगडाच्या बुरूजांना बांधून सुशोभित केले आहे.

**हजारो प्रश्नांची उत्तरे मिळवणारे मनोजभाई शिंदे :**

गुजराथेतील सूरत शहरातून सामना टाईम्स नावाचे वर्तमानपत्र गुजराथी व हिन्दीतून प्रसिद्ध होते. त्याचे मालक व संपादक मनोजभाई जन्माने मराठी असले तरी त्यांचे सर्व जीवन गुजराथमधे गेले. त्यांची नाडी ग्रंथांची ओळख झाली सुरतमधील नाडीकेंद्रात. प्रश्नकांडममधून हव्या तेवढ्या प्रश्नांची उत्तरे मिवायची परवानगी महर्षींनी दिली आणि तेथील शक्तिवेल या नाडीवाचकाच्या सहकार्यामुळे आत्तापर्यंत हजारो उत्तरांनी भरलेली रजिस्टर्स त्यांच्या ऑफिसमधल्या कॅबिनेटमधे सजली आहेत. अत्यंत धार्मिक, मनोजभाईं त्यांनी निर्माण केलेल्या मंदिरात पुजापाठ आणि अनेक विधी तर करतातच शिवाय वेळोवेळी शांतीदीक्षा करायला ते अनेक तीर्थस्थळांचे दर्शन घेतात. इतके प्रश्न तरी काय विचारतात ते? असे विचारता, त्यांनी पुजेचे महत्व, फुले व अन्य साहित्याचे महर्षींनी दिलेले मार्गदर्शन याचे त्यांच्या हातातील गुजराथीत अनेक पाने लिहून घेतलेले जाडजूड टिप्पण त्यांनी दाखवले. नर्मदेच्याकाठी महर्षींचे व कालीमातेचे मंदिर बांधायचा संकल्प त्यांनी सोडला आहे.

**कालीमातेचे पुत्र कालीचरण महाराज :** हिन्दी व मराठीत अस्खलित भाषापटु, कामाक्षीसह शक्तिपीठांच्या महात्म्यावर साप्ताहिक प्रवचनकार महाराज कालीमातेचे ते सुपुत्र आहेत असे नाडीभविष्य ऐकून त्या कथनामुळे अत्यंत प्रभावित होऊन नाडी ग्रंथांचे पाईक झाले आहेत. अगस्त्य महर्षींचे त्यांच्यावर विशेष वरदान आहे. त्यांचे हजारोंच्या संख्येने शिष्यगण आणि श्रोते आहेत. वैराग्यपूर्ण पण राजबिंडे देखणे रूप याची देणगी असलेले कालीचरण महाराज अनेकांना बरोबर घेऊन शांतीदीक्षेचे सोपस्कार यथासांग करवून आणतात तेंव्हा त्यांच्यावरील महर्षींच्या वरदानामुळे शिष्यगणांचे कल्याण घडते. राष्ट्राची उन्नती, व्यक्तिगत चारित्र्यवर्धन, वाणीतून बीभत्स अपशब्दांचे उच्चाटन अशा अनेक तऱ्हेने ते समाजसेवाही करतात.

**अगस्त्यमुनी गूफेला भेटीचा किस्सा:** प्रस्तूत लेखकाला अनेक अदभूत अनुभव येतात त्यातील नुकताच घडलेला किस्सा. तांबरम येथील पुज्य रमणीगुरूजीकधी कधी पुण्यात येतात. एक फेब्रुवारी दोन हजार सोळाला वाचनात काही घटना घडायसाठी तुझी साक्षी होण्याची वाट पहात आहेत असे म्हटले गेले. नंतर एक दिवशी मला माझे नाडीकथन नेटवरून मिळाले. त्यात तुला निष्कलंक महादेव या समुद्रातील स्थानाला भेट दे. नंतर हरिद्वारला गंगेत स्नान कर. नंतर माझ्या गूहेत ध्यानाला बस असे म्हटले गेले. गुर्जर देशातील भावनगरपाशी एक किमी समुद्रात फक्त ओहोटीच्या वेळी जाता येईल असे ते स्थान एरव्ही पाण्यात असते.

तिथे मी जाऊन आलो. नंतर अमेरिकेतील भ्रुगु महर्षींच्या आश्रमातील ३० जणांबरोबर हरिद्वारला गंगा स्नान घडले. अगस्ती गुहा कुठे असेल याचा गूगल व अन्य प्रकारे शोध चालू होता. हिमालयात ती असावी असा कयास होता. पण अचानक माहिती समोर आली आणि मी अजमेरला गेलो. पुष्करच्या वाटेवर एका पहाडीत अगस्त्य गुहा आहे असे कळले. नक्की कोणालाच माहित नव्हते. मला नेणाऱ्या ऑटो चालकाने, 'मी तुम्हाला खोटे बोललो कि मला ते ठिकाण कुठे आहे माहित आहे' असे म्हणून मला जंगलाच्या वाटेवर चाट पाडले. अशा परिस्थित इथवर येऊन परत हात हलवत जायची वेळ येते कि काय असे वाटत असता एके ठिकाणी चुंगी भरायला थांबलो असता वाटेवरच्या एका माणसाला सहज विचारले. त्याने आपल्या नातलगाला पहाडीच्या पायथ्याशी बोलवून वर चढायची सोय केली. रांगत आत जायला लागणारी गुहेच्या तोंडाशी 'अगस्त्य मुनी की गूफा' असे लिहिलेले होते. म्हणून ती गूफा हीच अशी खात्री झाली. आत मी साधना केली त्यावेळी आधीच एक व्यक्ती तिथे बसून ध्यान करत होती. तुमचे नाव काय म्हणून सहज मी विचारले तर उत्तर मिळाले 'मला नाव नाही'! असो. नंतर जयपूरला द्वादश ज्योतिर्लिंग मंदिराला भेट द्यायच्या आधी नाथद्वार मंदिर व कारोईयेथील भ्रुगु संहिता वाचनाचा अचानक लाभ झाला. सध्या मी गड आणि किल्ले यांच्या संवर्धनासाठी शोध घेत आहे त्यातील एक महत्वाचा जयगढ व त्यातील तोफा बनवायच्या कारखान्याला भेट देण्याचा योगही आला. असा आधी न ठरवता घडलेला प्रवास व त्याचे वर्णन नाडीकथनातून जसे आले होते ते सहजपणे घडताना अनुभवले गेले.

**किस्सा रिपोर्टर बाईंचा –** श्री. ईश्वरनना याच्या नाडी केंद्रात एकदा फोन आला. 'मी एका इंग्रजी नियतकालिकाची पत्रकार, आपला इंटरव्ह्यू घ्यायला येत आहे'. काही काळाने एक मॉडर्न वेशातील बाई हजर झाल्या. प्रश्न-उत्तरे सुरु झाली. तेंव्ह्यात श्री. ईश्वरनजींनी सुचवले, 'माझा इंटरव्ह्यू घेण्याआधी आपण आपले नाडी भविष्य पहावे म्हणजे मी काय म्हणतो त्याचा आपणाला प्रत्यक्ष पुरावा मिळेल. प्रत्यय ही येईल. मग आपणाला आणखी काही प्रश्न विचारायचे असतील तर विचारा'. त्या बाईंनी म्हटले, 'मला एक तर इतके थांबायला वेळ नाही. शिवाय भविष्य या प्रकारात मुळीच रस नाही. फक्त माझ्या वरिष्ठांनी सांगितल्यावरून मी हे काम करायला आलेली आहे. शिवाय माझ्या धार्मिक प्रथाही अशा प्रकारांना मान्यता देत नाहीत म्हणून मला ताडपट्ट्या पहायच्या नाहीत'.'जशी तुमची मर्जी' म्हणून ईश्वरन यांनी म्हटले. तथापि, काय झाले कोणास ठाऊक त्या व्यक्तीने आपले भविष्य पहायचे ठरवले. त्यांची पट्टी सापडल्यावर त्यात केलेल्या वर्णनावरून त्या व्यक्तीला धक्का बसला की माझी ही सर्व माहिती यांना कळाली कशी? कारण 'नाडी केंद्राच्या प्रथेप्रमाणे व एक जागरूक पत्रकार म्हणून फक्त हो-नाही इतकेच सांगा' असे निक्षून सांगण्यावरून तिने फार दक्षतापूर्वक लक्ष ठेऊन नाडी पट्टीचा वेध घेतला होता. मात्र तिची सध्याची परिस्थिती, पुर्वी झालेले दोनदोन विवाह, त्यातून तिला मिळालेली शारीरिक अत्याचाराची-मानहानीची वागणूक. याचा उल्लेख ऐकून ती चक्राऊन गेली. तिने आता पुन्हा लग्नाचा विचार मनातून काढला होता. त्यावर कडी म्हणजे तिचा तिसरा विवाह परदेशी व्यक्तीशी होईल व मुलही होईल म्हणून सांगितल्यामुळे तिला नाडी ग्रंथांवर विश्वास ठेवावा का नाही असा संभ्रम झाला.

त्या पुढची बातमी अशी की तिचा लेख आला. शांती दीक्षेचे उपाय करून यथावकाश पुढे गल्फ देशातील एकाशी तिचा तिसरा विवाह झाला व तिला अपत्य होण्याच्या मार्गावर आहे. असे नुकतेच कळाले!

सारखे सारखे खेटे मारणाऱ्या ग्राहकाचा किस्सा – एक ग्रहस्थ नाडी केंद्रात खेटे मारत होते. या अपेक्षेने की त्यांना हवे असलेले अपेक्षित उत्तर महर्षी देतील. शेवटी एकदाचे अत्री महर्षींनी त्याला सुचवले, 'असे कर की दक्षिणेत अमुक अमुक मंदिरांना भेटी दे. इतक्या जणांना दान-दक्षिणा दे'. वगैरे. त्यावर ते ग्रहस्थ थोडेसे रागावले. कारण त्यांना सांगितलेली शांतिदीक्षा त्यांच्या आर्थिक आवाक्याच्या बाहेरची होती. त्यांनी श्री. ईश्वरंना म्हटले, 'काहो, तुमचे महर्षी तर सर्वज्ञानी म्हणवतात, पण सध्याच्या माझ्या बिकट आर्थिक परिस्थितीची जाणीव त्यांना नाही, असे मी समजायचे काय? शिवाय असे खर्चिक सोपस्कार सांगितल्यामुळे मला तुमच्या सचोटीबद्दल शंका उपस्थित होत आहे. ही गोष्ट मी विंग कमांडरांच्या कानावर घालणार आहे. या प्रकाराला ते नक्कीच वाचा फोडतील'. काही दिवसांनी मी (ओकांनी) ईश्वरनना या प्रकाराबद्दल विचारणा केली. तेंव्हा त्यांनी जे उत्तर दिले ते त्यांच्याच शब्दात देतो, 'माझ्या पहाण्यात आले आहे की जेंव्हा प्रश्नकर्त्याला त्याला अपेक्षित उत्तर मिळत नाही तेंव्हा तो इरेला पडतो. तोच तोच प्रश्न विचारून भंडावतो. निवडणूकीतील उमेदवारी, लग्नसंबंधातील गुंतागुंतीचे ताणतणाव, व्यवसाय वा प्रॉपर्टीची लफडी वगैरे कारणांनी जादा. तुमच्याशी संपर्क केलेल्या त्या ग्रहस्थांना दक्षिणेत जा म्हणून सांगून त्याला अवांछनीय कर्मापासून परावृत्त होण्यासाठी खर्चाने अशक्य गोष्ट सांगून सुचवले होते. या उलट अनेकदा पृच्छकाला नकोसे उत्तर मिळाले तर तो वाट्टेल तेवढ्या रकमेची शांती-दीक्षा करीन म्हणून मागे लागतो. त्यावेळी आम्हाला पैशाच्या मोहापासून दूर राहावे लागते.

**हट्टला पेटलेल्या बाईंचा किस्सा –** श्री. ईश्वरन म्हणाले, 'एक सुस्थितीतील स्त्री डॉक्टर. तिने अत्री महर्षींचा सल्ला मागितला की मला अमक्याशीच विवाह करायचा हट्ट आहे'. करू काय? महर्षींनी उत्तर देण्याआधी तिला दक्षिणेतील एका मंदिराला भेट द्यायला सांगितल्यावर, 'हे काय नविन लचांड?' असे वाटून तिचा विरस झाला. तरीही ती त्याप्रमाणे जाऊन आली. परत संपर्क करून म्हणाली, 'मी त्या मंदिराला भेट देऊन आले. शिवाय तुम्ही सुचवलेले नसतानाही ज्याच्याशी विवाह करू इच्छिते त्याला ही बरोबर घेऊन गेले होते. प्रवासाच्या दरम्यान मला असे कळले की मादक पदार्थांचे टोचून घेऊन सेवन करण्याची त्याला त्याला सवय आहे'. महर्षींनी तिलाच विचारले की आता तूच ठरव काय करायचे ते. मी 'करू नकोस' सांगितले असते तर तुला ते कधीच मान्य झाले नसते.

श्रीमंतांपासून गरीब सामान्यांपर्यंत, नट-नट्यांपासून ज्योतिषशास्त्रांपर्यंत अनेक थरातील, वर्गातील, व्यवसायातील व्यक्तींनी आजपर्यंत जीवनाडीचे अनुभव घेतलेले आहेत. ही डहाणूकर कॉलनीतील आठव्या गल्लीतील वैष्णवी अपार्टमेंट्स (फोन क्र.- ०२०२५३९५९४९) या श्री. ईश्वरन (मो. ९३२२७९०८३९) यांच्या व श्री. वैद्यनाथन (मो.९४२३२४४१२५ व ९९६०९२३८७९) यांच्या फ्लॅट क्र १०१, बिल्डींग क्र ए- ३/४ योगी हौ. सोसा. अजमेरा कॉम्पलेक्स, यू सेंटर, पिंपरीतील नाडी केंद्रात उपलब्ध आहे. प्रत्येक प्रश्नाला रु.२००. प्रमाणे एकावेळी पाच प्रश्न विचारण्याची सोय आहे. सोमवारी बंद.

# १२. हा घ्या चमत्काराचा पुरावा!

**हा घ्या चमत्काराचा पुरावा !**

सोबतच्या नाडीपट्ट्यांच्या व मलपृष्ठावरील दोन्ही फोटोंमध्ये 'शशिकांत' हे नाव पहिल्या ओळीतील दोन टिंबांच्या मधे कुठे व कसे कोरून काढलेले आहे याचे तमिळ भाषा न जाणणाऱ्या वाचकांसाठी दिलेले स्पष्टीकरण :-

| देवनागरी लिपी | ENGLISH | तमिल लिपी | कूट तमिल लिपी |
|---|---|---|---|
| श | SHA | ச | |
| शि | SHI | சி | |
| का | KA | கா | |
| (अनुस्वार) . | N | ந | |
| त | THA | த | |




**नाडीपट्टीत व्यक्तींची नावे कोरलेली असतात ?**
नाडी भविष्य पाहताना तामिळ न जाणणाऱ्या लोकांना खरेच नाडी पट्ट्यात व्यक्तींची नावे व अन्य माहिती खरोखरच कोरून लिहिलेली असते का? असा प्रश्न पडतो. त्याचे उत्तर 'होय' असे आहे. त्याचा एक नमूना सोबतच्या फोटोतील वेगवेगळ्या केंद्रात, ४ वर्षाच्या फरकाने मिळालेल्या दोन पट्ट्यात लेखक 'शशिकांत' यांचे हे नाव कोरल्याचा प्रत्यक्ष पुरावा!

चमत्कार झाला असे नुसते म्हणण्याला काही अर्थ नसतो. कारण अशा घटना, वाचनात किंवा ऐकिवात आल्या तरी त्यामुळे संतुष्टी होत नाही. त्या चमत्काराच्या घटनेचा तात्काळ पुरावा मिळवून त्याची सत्यता तपासल्या नंतर ती चमत्काराची घटना मान्य केली जाते. नाडी भविष्याच्या पट्ट्यात व्यक्ती च्या संदर्भातली नावे कूट तमिळमधे कोरून लिहिलेली असतात याचा पुरावा सादर केला जाणे अत्यंत महत्त्वाचे आहे. त्या दिलेल्या पुराव्यांची शहानिशा करून ती लिपी किंवा कोरून काढलेली नावे खोटी आहेत हे सिद्ध करण्याची जबाबदारी नाडी भविष्याला नावे ठेवणार्यांनसाठी जीवन मरणाचा प्रश्न बनायला हवी.
सामान्य मराठी वाचकाला तमिळ भाषा व पट्टीवरील कूट लिपीचा गंध नसतो. खरे काय कोणास ठाऊक? असे वाटू लागते. त्या सर्वांच्या समाधानासाठी सोबतच्या चौकटींकडे शोधक नजरेने पाहणे आवश्यक आहे. दोन वेगवेगळ्या नाडीपट्ट्यामधे शशिकांत नाव कोरलला दाखवणारा फोटो आणि तमिळ लिपीत प्रिंट करुन प्रत्येक अक्षर पट्टीत कसे दिसते याचे प्रत्यक्ष प्रमाण सादर केले आहे. शोधकवृत्तीच्या वाचकांना विनंती आहे की त्यांनी तमिळ अक्षरे आणि पट्टीवरील कूटलिपीतील लपेटी, आणि हस्ताक्षराच्या स्वातंत्र्यामुळे झालेल्या लेखनाचा विचार करून शशिकांत हे नाव दोन्ही पट्ट्यात कसे काढले गेले आहे याचा अत्यंत बारकाईने अभ्यास करावा आणि व्यक्तीचे नाव पट्टीत कोरून येते किंवा नाही हे ठरवावे...

❑❑❑

## १३. नाडी ग्रंथ पट्टी मिळणे ही किती अशक्यप्राय गोष्ट आहे ?

सहज कल्पना करा की आपण एका प्रचंड पूर आलेल्या नदीच्या पात्रावरील पुलावर मजा म्हणून उभे आहात. गंमत म्हणून खिशातून काड्याची पेटी काढून त्यातील एक काडी त्या घोंघावणाऱ्या पाण्याच्या प्रवाहात फेका. नंतर काड्याच्या पेटीतील आणखी एक काडी काढून ती फेका. आता त्या दोन काड्या प्रवाहात कुठेतरी पडून दिसेनाशा होतील. आता विचार करा की काही सेकंदाच्या फरकाने फेकलेल्या त्या काड्या कधी पुन्हा एकत्र येतील काय ? सामान्य उत्तर कधीच नाही असे असेल. तथापि, गणितज्ञ या उत्तराशी सहमत होणार नाहीत. कारण ते गणिती आकडे मोड करून अतीशय क्लिष्ट संख्या मांडून अति दुर्मिळ पण अशक्य नाही असे त्यांचे उत्तर देतील. या पुढे असा विचार करा की त्याच काड्या काही कारणानी, काही काळानी त्याच काड्याच्या पेटीत पुन्हा एकत्र येतील काय? याचे उत्तर असे घडणे अशक्य कोटीतील आहे, असे येईल.

का? तर त्या वेळची परिस्थिती संपूर्ण बदललेली असेल. काड्या मोडून गेल्या असतील. माणूस जागेवर नसेल. नदीत पाणी नसेल. आणखी अनेक कारणे असतील की ज्यामुळे त्या दोन काड्या एकत्र येणे शक्य होणार नाही. तरीही 'असे अघटित घडेल' असे कोणी म्हणाला तर त्याला मूर्खात काढले जाईल. तर्क मान्यता देणार नाही. वुद्धीने विश्वास ठेवणे अशक्य होईल.

ते कसे शक्य आहे? आता असा विचार करा की ती घोंघावणारी नदी म्हणजे काळाचा एक प्रचंड ओघ आहे. त्याच्या एका टोकावर नाडी भविष्याच्या कर्त्या महर्षींनी ताडपत्रावर कोरून एका व्यक्तीची पट्टी त्या काळाच्या प्रवाहात सोडली. मधे किती काळ गेला कोणालाच माहीत नाही. पुढे एक व्यक्ती जन्माला आली. जणू काही काड्याच्या पेटीतील दुसरी काडीच. काही विशिष्ट काळ गेल्यावर त्याला आपले भविष्य पाहाण्याची बुद्धी झाली. तोवर त्याच्यासाठी लिहिलेली पट्टी धक्के खात-खात हजारो पट्ट्याच्या गठ्ठ्यात पडून होती. जणु काही तिला माहितच होते की तिला कुठे व कधी त्या दुसऱ्या काडी समान व्यक्तीला भेटायचे आहे. वेळ आली की ती व्यक्ती खूप धावाधाव करून भेटणारच. भले तिला त्या पट्टीतील भाषेचा गंधही नसेल. विश्वास ही नसेल त्याचा की त्याच्या करता कोणी फार पूर्वी पासून एकजण पत्र लिहून गेला आहे. या भावनेने की ती पट्टी त्याने वाचावी व आपले हित कशात आहे हे जाणावे. त्या पट्टया लिहून ठेऊन गेलेल्यांना काही संपत्तीचा किंवा आणखी कशाचा लोभ म्हणून त्यांनी ते पत्र लेखन केलेले नाही. तर निष्काम भावनेने केलेली ती मानवतेची सेवा आहे.

आपण जेंव्हा नाडी केंद्रात जातो व आपले भविष्य पाहायला बसतो. ती वेळ इतकी अतिदुर्मिळ असते याची जाणीव प्रत्येकाने ठेवावी.त्या महर्षींनी केलेल्या कार्याची जाण ठेवावी. आपल्याला त्यातील समजेल तितका, रुचेल तितका आनंद घ्यावा. त्यात सांगितलेल्या गोष्टी आनंदाने स्वीकाराव्या. नाही ऐकलेत, बकवास आहे, थोतांड आहे, म्हणालात तर तुमची मर्जी. आता अशांच्या सारख्या पढतमूर्खांना कोण काय करणार? नाही का?

❑❑❑

# १४. तुम्हीच तुमचे नाडी भविष्य लिहा!

**नाड़ी ग्रंथ भविष्य पुढील घटनांच्या संदर्भात बरोबर येतेच असे नाही असे का ?**

या अधिवेशनात या बाबत कडाक्याची चर्चा घडावी अशी अपेक्षा असणे स्वाभाविक आहे. कारण अनेकांचा अनुभव ओकांच्या लेखनाशी जुळत नाही असा आहे. मग यावर ओकांचे उत्तर काय? यावर सविस्तर उत्तर देणे कार्यक्रमाच्या वेळापत्रकात बसणे शक्य नव्हते म्हणून या पत्रातून विचार व्यक्त करून सांगण्याचा प्रयत्न करीत आहे. प्रत्येकाचे समाधान होईल अशी आशा आहे. माझ्या आधीच्या पुस्तकातून प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या पुस्तकातील महत्वाचा भाग देऊन उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. तो अनेकांनी वाचला ही असेल.

यावेळी फ्लाईंग ऑफिसर धनंजय मोटे या माझ्या जिवलगाचे एक जळजळीत उदाहरण घेऊन यावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न आहे.

साल २००२. वायुसेनेत पंजाबमधे पोस्टींगवर असताना माझी ओळख फ्लाईंग ऑफिसर धनंजय मोटेशी झाली. सांगलीचा उमदा तरूण, रोज पहाटे जप-साई साधना, ऑफिसच्या कामात हाय ग्रेडिंग, इंग्रजी अस्खलित, बॉक्सिंग, गिटार वादन, पेंटिंग-ड्रॉईंग हॉबीज़, थोडक्यात बेस्ट ऑल राऊंडर.लगेच आमची मैत्री झाली. त्याने नुकतीच विकत घेतलेली इंडिका मोठ्या आनंदाने आईला-बहिणांना आभिमानाने दाखवण्यासाठी लुधियानाहून सांगलीपर्यंत एकट्याने चालवत आणली.

वाटेत पुण्यात त्याचे नाडी भविष्य पहायला तो व मी एकत्र. पट्टी सापडली. उज्वल भविष्य. मोठ्या हुद्द्यावर बढत्या. मुले-बाळे. भरपूर आयुष्य. लग्न या दोन महिन्यात ठरेल. मात्र विवाह वयाच्या पुढील वर्षात घडेल. सातव्या कांडात वधूचे वर्णन- मॉडर्न नावाची, सिनिक ब्युटीच्या ठिकाणची, वगरै वगैर.पुढील काही दिवसात ऩाडी कथनाप्रमाणे तंतोतंत वर्णन असलेल्या व्यक्तीशी - पन्हाळ्यातील (सिनिक ब्युटीच्या), जिच्या घराच्या समोर कोरडा तलाव असलेल्या, मॉडर्न नावाच्या स्थळाशी लग्न ठरले. धनंजय तात्काळ विवाहाला तयार असून देखील तिचा व तिच्या मोठ्या बहिणीचा विवाह एकत्र करता यावा म्हणून विवाहाची जी तारीख नक्की झाली ती नेमकी धनंजयच्या वयाच्या पुढील वर्षाच्या वाढदिवसानंतर काही दिवसांची. मी सहपरिवार मुद्दाम विवाह सोहळ्याला हजर. पुढे मी रजा संपवून कामाला हजर. त्याचा हनिमून वगैरेचा प्रोग्राम संपवून तो पत्नीला आणायला व तिच्या आईवडिलांना भेटून पंजाबात ड्युटीवर परतण्यासाठी सांगलीहून कारने निघाला. जयसिंगपूरच्या पुढे रेल्वेच्या ओव्हर ब्रिजवर ट्रकने जबरदस्त धडक दिल्यामुळे जबर जखमी होऊन खलास झाला.पंधरा दिवसाच्या आत. मी त्याच्या फ्युनरलला वायुसेनेतर्फे हजर!

काय ओक? हे असे कसे झाले ? काय म्हणणे आहे आपले ? आपले महर्षी असे कसे चुकले ? अनेकांचे अनेक प्रश्न. काही बोलून. काही न बोलता. नाडी, नाडी उगाच करतात. चांगली आपटी बसली. काहींचा सात्विक राग. कुठले महर्षी आणि

कुठले काय सगळ्या थापा. अनेकांची मते-मतांतरे. काय गफलत असावी. मी विचार करत राहिलो. नाडी वाचकांचा भाषांतरकाराचा काही संबंध नव्हता की त्यांच्यावर ढकलून मोकळे होता येईल.

प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांची वाक्ये कानात घुमत होती. भविष्य पाहाणाऱ्याच्या दृष्टीने जो भूतकाळ असतो तो ऋषीमुनींना (जेंव्हा त्यांनी नाडी ग्रंथ लिहिले त्या वेळी) भविष्यकालच होता. पृच्छकाचा तो भूतकाळ त्या ऋषीमुनींनी अगोदरच भविष्य वर्तवल्यामुळेच बरोबर आला. हे तो नाकारू शकत नाही. तेंव्हा भविष्य चुकते हे म्हणणे बरोबर नाही. नाडी ग्रंथ पाहिल्या तारखेनंतर पृच्छकाचे भविष्य चुकत असेल तर ते का चुकावे याला निश्चित कारण असले पाहिजे. म्हणजे

भविष्य चुकत नाही मुद्दाम चुकवले जाते.

नाडीचा उद्देश कर्मविपाक सुलभ रितीने व यथान्याय घडवून आणणे हा आहे. भविष्य बरोबर सांगणे हा नाही. हे प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांचे म्हणणे खरेच का ते आपण पाहू.

आता वाचकांना मी एक विनंती करतो की आपणच नाडी महर्षी व्हा. म्हणजे असे की धनंजयच्या संदर्भातील घटना आपणास माहित आहेत. त्यावरून आपण जणू धनंजयची पट्टी लिहिणारे महर्षी आहात असे माना. आता आपल्याला लक्षात येईल की जर आपल्याला धनंजयच्या पत्नीला विधवा होण्याचे भाग्य सिद्ध करायचे असेल तर तिचा विवाह घडवायला हवा. तो धनंजय सारख्या व्यक्तीशी की ज्याचे आयुष्य विवाहानंतर अत्यंत कमी आहे. आता त्याने नाडी भविष्य पाहिले तेंव्हा महर्षींना म्हणजेच आत्ता तुम्हाला एक तर त्याचे भविष्य न सांगून (पट्टी सापडत नाही हा त्यातील एक उपाय) किंवा पट्टीत असे सणसणीत लिहून की त्याने तातडीने विवाह करायलाच हवा. तोही त्याच मुलीशी. यासाठी त्याची पट्टी लगेच मिळेल अशी तयार ठेवली जायला हवी. त्यात त्याच्या भावी पत्नीचे हुबेहुब वर्णन आपणास असे केले पाहिजे की त्या मुलीशीच तो विवाह करायला सिद्ध होईल. आता विवाह धनंजय तेंव्हाच करेल जेंव्हा आपण त्याला त्याचा भावी काळ उज्वल असेल अशी खात्री वाटेल असे लिहाल. आयुष्यात पत्नी, मुले-बाळे असतील. आयुष्याची दोरी बळकट असेल. का असे लिहाल की बाबा रे तू तर चार दिन का मेहमान. तरीही एका मुलीचे आयुष्य तू तिला विधवा करून बरबाद करणार आहेस. म्हणून तू तिच्याशी तातडीने विवाह कर. सत्य कथनच करीन असे नाडी भविष्यकार म्हणून जरी आपण लिहिलेत तरी कोणीही सूज्ञ, त्यातून धनंजय सारखा विचारी व्यक्ती ते कधीच मानणार नाही. तो विवाहच करणार नाही. आपण नाडी महर्षी आहात, त्यामुळे आपणास कर्मविपाकाशी तडजोड करता येणार नाही. मग आता आपणाला धनंजयला दीर्घ आयुष्याचे रंगित स्वप्न दाखवणे भाग आहे. त्याने अन्य कोठल्या मुलीशी विवाह करून उपयोग नाही. म्हणून त्याला सात नंबरचे कांड तयार करून ठेवले पाहिजे. त्यात अशा तऱ्हेने वर्णन केले पाहिजे की जी मुलगी अजून पाहिली नाही तीच माझी पत्नी आहे अशी त्याचीच नव्हे तर त्याच्या घरच्यांची देखील खात्री असावी. 'कार मधून जाताना धनंजयच्या घरचे त्या मुलीला पाहण्याधीच म्हणत होते की दादा हीच आमची वहिनी'!

आपण म्हणजे नाडी महर्षी, धनंजयची पट्टी न लिहून त्याच्या मृत्यूची घटना घडून गेल्यावर, नाडी

भविष्यावर येऊ घातलेला खोटेपणाचा आळ चुकवू शकला असता. मग आपण असे का केले नाहीत? का नाडीभविष्याला बदनाम व्हायला कारणीभूत झालात? कारण आपणाला भविष्य कथन करणे हा एकच उद्देश ठेऊन नाडी पट्ट्या लिहायच्या नाहीत. कर्मविपाक सुलभ व ठरल्याप्रमाणेच घडावा यासाठी ही आपणास कार्य करायलाच हवे आहे. हे ही लक्षांत असू दे की हे लिखाण आपणास कूट लिपीतून श्र्लोकबद्ध करून, काव्याची सर्व बंधने पाळून, लिहायला हवे आहे.

आपणास धनंजयची पट्टी लिहायलाच हवी असण्याचा आणखी एक उद्देश असा की या पट्टी वाचनास ओकांना त्या भविष्य कथनाचे साक्षी करून हे ही दाखवून द्यायचे आहे की पुढे काही काळानंतर नाडी भविष्याकडे लोक जेंव्हा प्रश्नार्थक नजरेने पाहतील, आमची निंदा करून अवमान करतील तेंव्हा तुला (ओकांना) आमची बाजू मांडता यायला नको का? कदाचित पूर्वी जसे त्यांच्या पत्नीच्यासाठी आम्ही तीन पट्ट्या लिहून ठेवल्या होत्या. त्यातील शेवटची पट्टी त्यांना आगामी काळात व्यक्तीचे नाव नाडीपट्टीत कसे कोरून लिहिलेले असते हे दाखवून देण्यासाठी एक पुरावा म्हणून उपयोगाला येईन अशी व्यवस्था केली गेली. त्याच प्रमाणे यापुढे ओकांच्या लेखनाने सामान्य लोकांचा आमच्याकडे पहायचा दृष्टीकोन त्यामुळे दूषित राहू नये. यासाठी ही धनंजयची पट्टी कामाला यावी.

बरेच जण कोणला मुलगा होईल सांगितले व मुलगी झाली तर आमच्यावर रुसतात. खट्टू होतात. असे समजा की मराठीत 'मुल' च्यापुढे 'गा' आणि 'गी' मधे काना-मात्रेचा कितीसा तो फरक? तमिळमधेही तसेच आहे. त्यात हात न उचलता लिहायच्या प्रथेमुळे लेखनिकांकडून होतो असा विपर्यास. मुलामुलींचे विवाह सांगितल्याबर हुकूम घडत नाहीत तेंव्हा त्या व्यक्तींच्या विवाहाला दीर्घ काळ लागणार असला तरी उदासीनता न यावी असाही उद्देश आम्हाला ठेवावा लागतो. म्हणून पुन्हा पुन्हा शांती दिक्षेची मात्रा द्यावी लागते. तेंव्हा नाडी भविष्य चूक, खोटे असे सरसकट म्हणणे कितपत योग्य आहे याचा विचार आपण करावा.

❑❑❑

## प्रतापगढच्या भृगु संहितेच्या शोधात



पाली लिपी वाचनकरताना पं. मिश्रजी

प्रयाग अलाहाबादपासून ५० किमीवर प्रतापगढ नावाचे गाव आहे. तिथे भृगु संहितेची ३-४ केंद्रे असून त्यांच्याकडे पाली लिपीत लिहिलेली पत्रे आहेत असे कळल्याने आम्ही (मी व विवेक चौधरी) नेपाळयात्रेची सांगता तिथे केली. डॉ बिपिन मिश्र, डॉ. साधना सुर्या आणि डॉ. अनिता प्रकाश यांच्या केंद्रात त्यांच्या शाल व श्रीफळ देऊन सत्कार केला. आमच्या पट्ट्या शोधायला वेळ कमी असल्याने मिळाल्या नाहीत. परंतु त्यांच्याकडे पट्टीतील संस्कृत लेखन देवनागरीत कसे लिहून दिले जाते याचा नमुना म्हणून एकांचे कथन आम्हाला मिळाले.

# १५. नाडिग्रंथांतील जन्मदिनांकाची नोंद – एक अभ्यास

## लेखक :– हैयो हैयैयो

नाडिग्रंथ हा वाचकांसाठी काही नवा विषय राहिलेला नाही. गेल्या काही दशकांत ह्या विषयाच्या अभ्यासाची व्याप्ती ही फार वाढलेली दिसून येते. विविध विषयांच्या अभ्यासकांसाठी नाडिग्रंथांमधील रोचकता ही केवळ भविष्यकथनापुरतीच मर्यादित राहिलेली नसून त्याही पलिकडील अनेक विषयांच्यावर आज चर्चा होतांना दिसते. ह्यात मुख्यत: नाडिग्रंथांतील लिपी, भाषा, उपयोजिलेले काव्यप्रकार अशा; थोडक्यात, ज्योतिषशास्त्राहून भिन्न अशा विषयांवर मोठ्या प्रमाणात अभ्यास होतांना दिसून येतो. ह्याच अनुषंगाने जानेवारी २०१० मध्ये पुणे येथे झालेल्या नाडिग्रंथ अधिवेशनामध्ये मी कूटलिपी – एक विचार हा नाडिग्रंथांत आढळणा–या लिपीबाबतचा विश्लेषणात्मक शोधनिबंध सादर केला होता. ह्या शोधनिबंधावर चर्चा घडल्या, त्याहीनंतर अनेकांनी मला वैयक्तिकरीत्या तसेच जाहिररीत्या प्रश्न केले, ते सारांशात असे: हैयो, आपण ग्रंथलिपी आणि नाडिग्रंथांतील कूट्टेळुत्तु लिपी ह्यांचा संबंध दाखविणारी शोधनिबंधामध्ये प्रस्तुत केलेली माहिती मोठी रोचक आहे. लिपीशास्त्राभ्यासाच्या निमित्ताने आपण नाडिग्रंथांतील विविध हस्तलिखिते हाताळल्याचे आपल्या विश्लेषणातून कळते. त्या हस्तलिखितांतील मजकूर काही कां असेना, आपण आतांपर्यंत अभ्यास केला त्यात आपणांस काय दृष्टीपथास पडतें, त्याबद्दल सांगा बरें! विंग कमांडर (श्री. शशिकांत ओक) साहेब पट्ट्यांतून जातकाची नांवे, कुंडलीचे वर्णन इत्यादि येते असे ठासून सांगतांत, त्याबद्दल आपले काय म्हणणे आहे?

नाडिग्रंथांसंबंधी जे अनेक दावे केले जातांत त्यापैकी एक मुख्य दावा म्हणजे त्यांत व्यक्तीचे नांव, जन्मदिनाची नोंद कोरून येणे हा होय. असा दावा निश्चितच चमत्कारिक ठरतो. ह्या प्रकारच्या चमत्कृतिपूर्ण दाव्यांमुळे अनेक वादापवाद आतांपर्यंत उद्भवून गेलेले आहेत. अशामुळे अभ्यासकांच्यामध्ये नाडिग्रंथांवर 'विश्वास ठेवणारे' आणि 'विश्वास न ठेवणारे' असे दोन मुख्य गट सिद्ध झाले आहेत. बरे, अशा दाव्यांमुळे होते काय, की विविध अभ्यासक विविध प्रकारचे दृष्टीकोन घेऊन नाडिग्रंथावलोकन करताना दिसतात. काहीजण, धादांत खोटा दावा आहे. अशाप्रकारे माहिती लिहून ठेवलेली असणे अशक्य आहे, चला दाखवतोच मी अशा आविर्भावामध्ये नाडिवाचकास आणि पर्यायाने नाडिग्रंथांस खोटे सिद्ध करण्याकरिता ग्रंथावलोकन करतात, तर इतर काही चला बघुया कसे काय नांव लिहून येते ते असा थक्क होण्याचा विलक्षण थरार अनुभविण्यासाठी म्हणून ग्रंथावलोकन करावयास जातात. ह्या काही चिकित्सकांच्या अशास्त्रीय दृष्टीकोनामुळे आतांपर्यंतच्या ह्या विषयाच्या प्रवासाकडे एक दृष्टीक्षेप टाकतां, वास्तवापासून दूर आणि तारतम्याचा अभाव असलेली चिकित्सा झाली असल्याचे ध्यानी येते. असो. अभ्यासकाने खरेखोट्याचे निराकरण करण्याकरतां तारतम्याने वास्तवचिकित्सा करणे अभिप्रेत आहे, हे ध्यानी ठेवून मी स्वत: ह्या दोहोंव्यतिरिक्त तिस–या, तटस्थ अशा गटाचे प्रतिनिधित्व करतो आहे. नाडिग्रंथांमध्ये हस्तलिखित ताडपत्रे असल्याने, भाषाशास्त्र

आणि लिपीशास्त्र हे दोन विषय नाडिग्रंथांच्या अभ्यासास अपार सहाय्य करू शकतात असा माझा ठाम विश्वास असून ह्या अनुषंगाने लिपी आणि भाषा इत्यादि बाबींचा सखोल विचार होणे आवश्यक आहे असे मी पूर्वीच सुचविलेले होते. त्याप्रमाणे एका स्वतंत्र दृष्टीकोनातून नाडिग्रंथांबद्दल मला जे काही दृष्टोत्पत्तीस येते, ते प्रामाणिकपणे इतरांसमोर प्रस्तुत करावयाचा हा एक प्रयत्न होय.

नाडिग्रंथांमध्ये लेखन केलेले असते काय, असल्यास ते कोण्या लिपीमध्ये ह्या स्वत:स पडलेल्या प्रश्नाच्या उत्तरासाठी मी केलेल्या संशोधनामध्ये मला जे काही आढळले ते मी कूटलिपी – एक विचार ह्या शोधनिबंधात स्पष्ट केलेलेच आहे. ह्या शोधनिबंधानंतर आंतरजालावरील तथा माहितीतील अनेकांनी स्वत: होवून आपणा स्वत:च्या तसेच आप्तस्वकीयांच्या नाडिग्रंथांवरून लिहून काढलेल्या वह्या मजजवळ (नांवे उघड न करण्याच्या अटींवर) अभ्यासासाठी पाठवून दिल्या. एकत्रितरीत्या ह्या सा-या व्यक्तींचे नाडिग्रंथावलोकन हे मुंबई, पुणे, दिल्ली, बंगळूरु, चेन्नै, वैत्तिश्वरन् कोयिल् आणि दक्षिणभारतांतील इतर काही ठिकाणचे, थोडक्यात विविध ठिकाणचे आहे. व्यक्तीच्या जन्मदिनाची नोंद कोरून येते हे म्हणणे बरोबर आहे काय ह्या प्रश्नाचे सरळ उत्तर देण्यासाठी ह्या वह्यांतून मला ह्याबाबतीत काय दिसते ते मी आपणासमोर ठेवू इच्छितो.

पहिली वही सध्या वयाने साधारणत: तिशीमध्ये असणा-या व्यक्तीची आहे. ह्या व्यक्तीच्या वहीमध्ये जन्मविषयक नोंद खालील श्लोकाच्या रूपाने मिळते:

| तमिळ लिपीमध्ये | देवनागरी लिपीमध्ये |
|---|---|
| மேலான சித்தார்த்தி ஆண்டுத்தோற்றம் | [1]मेलाऩ सित्तार्त्ति आण्ड्त्तोट्रम् ।1। |
| மாடதுவின் திங்களதில் இருபானீர்தெய்தி | माडदुविन् तिङ्गळदिल् इरुबाऩीर्तेय्ति।2। |
| சாலசெய் வாரமதில் சித்திரைவின்மீன் | सालसेय् वारमदिल् सित्तिरैविन्मीन् ।3। |
| சாற்றரவி மையின்மேல் கவிசேயுள்ளே | साट्रवि मैयिन्मेल् कविसेयुळ्ळे ।।4।। |
| உள்ளதன்பின் ரவியோர் மாலும்யாழில் | उळ्ळदन्पिन् रवियेर् मालुम्याऴिल् ।1। |
| உயர்மன்னன் வயலதுவில் கரிராவேங்கை | उयर्मन्ऩन् वयलदुविल् करिरावेङ्गै ।2। |
| கள்ளமிலா மதிமங்கை சிகிகலசம் | कळ्ळमिला मदिमङ्गै सिगिहलसम् ।3। |

ह्या श्लोकातील पहिल्या दोन ओळींचा अर्थ: ह्या व्यक्तीचा जन्म सिद्धार्थी (तमिळ उच्चार 'सित्तार्त्ति') संवत्सरात रवी वृषभाच्या (माडदुविल्) महिन्यात असतांना तमिळ पंचांगाप्रमाणे २२ व्या तिथीवर मंगळवारी झाला. एवढ्याश्या माहितीवरून नाडिवाचकास आपला जन्मदिनांक प्रचलित पद्धतीप्रमाणे आंग्लभाषेमध्ये सांगण्यासाठी गणित घालणे आवश्यक असते. ह्यासाठी भारतीय कालमापनपद्धतीचा सखोल अभ्यास असणे अत्यावश्यक होय. नाडिग्रंथांतील श्लोकांमधून व्यक्तीच्या जन्माशी निगडीत दिनांकाची मांडणी ही नेहमी संवत्सर / मास / दिन अशा क्रमपद्धतीने समोर येते. ग्रंथांतील संवत्सराचे नांव हे तमिळभाषक लोकांच्या ६० वर्षांच्या तमिळ दिनदर्शिकेप्रमाणे नोंदविलेले आढळते. अभ्यासकांच्या मते अत्यंत अचूक अशी ही दिनदर्शिका असून तीत संवत्सरांची नांवे आणि त्यांचा क्रम हा ठरलेला असतो. अशा ह्या तमिळ दिनदर्शिकेप्रमाणे सित्तार्त्ति म्हणजे एप्रिल १९७९ ते मार्च १९८० होय. एवढ्या ह्या माहितीवरून व्यक्तीच्या जन्मवर्षाची साधारण कल्पना आपणास येते. येथून पुढे सूर्य कोण्या महिन्यात कोण्या राशीत प्रवेश करतो हीही माहिती ठेवणे आपणास आवश्यक ठरेल. साधारणत: १५ मे च्या सुमारास सूर्य वृषभराशीमध्ये

प्रवेश करतो असे धरून, १५ मे पासून पुढे २२ दिवस मोजणे आतां आपणास आवश्यक आहे. हे मोजून येतो तो दिनांक म्हणजे ६ जून होय. थोडक्यात, ६ जून १९७९ हा दिनांक आपणास मिळाला.

खरेतर, तमिळ दिनदर्शिकेनुसार वरील श्लोकांत उल्लेखलेले सिद्धार्थी वर्ष हे १९७९-१९८० पूर्वी १९१९-१९२० मध्येही येवून गेलेले आहे, आणि ह्यानंतरही ते २०३९-२०४० मध्ये येणार आहे. अशावेळी, जातकाचा जन्म १९७९-१९८०

वरील उदाहरणातून नाडी ग्रंथांच्या काव्य निर्मितीतील यमक जुळवण्याचे कौशल्य ही जाता जाता समजावून घ्यावे लागेल. उदा. १. श्लोकाच्या पहिल्या व दुसऱ्या आणि तिसऱ्या व चौथ्या चरणांचे प्रथमाक्षर तेच असावे लागते. जे बोल्ड करून दर्शवले गेले आहे. २. एका श्लोकाचा अंत तोच पुढील श्लोकाचा आरंभ असावा लागतो. जे या रंगाने दर्शवले गेले आहे. याला तमिळ भाषेत 'अंतादि यमक' असे म्हणतात. ३. पहिल्या चरणातील दुसरे अक्षर आणि तिसऱ्या चरणातील दुसरे अक्षर समान असावे लागते. जे या रंगाने दर्शवले आहे. याला तमिळ भाषेत सिंदुपा यमक असे म्हणतात. वाचकांनी आपल्या जन्म दिनांकाला आपल्या भाषेत असे काव्यमय श्लोकात गुंफायचा प्रयत्न करावा. नाडी ग्रंथातील प्रत्येक श्लोक वरील यमकांच्या बंधनात राहून रचला गेला आहे; तर मग नुसते यमक काव्य जुळवायला किती कष्ट पडत असतील याचा अंदाज बांधावा.

मध्येच झाला हे नाडिवाचक कसेकाय सांगेल? अर्थात, समोर बसलेल्या जातकाकडे बघून तो वयाने तिशीतील आहे हे नाडिवाचकास नक्कीच कळू शकेल; तरीही, नाडिग्रंथांतून वाचून नाडिवाचक जे काही सांगतो आहे, त्याची खात्री जातकाने कशी पटवून घ्यावी? ही खात्री पटण्यासाठी नाडिग्रंथलेखकाने पडताळणीची सोय करून ठेवलेली असल्याचे आपणास क्रमशः येणाऱ्या श्लोकांमधून कळते. पुढील श्लोकांमध्ये सिद्धार्थी नामक त्या विवक्षित संवत्सरामध्ये सूर्य वैशाख महिन्यात प्रवेशून २२ वी तिथी असतांना मंगळवारी अवकाशामध्ये जी काही ग्रहस्थिती होणार असेल, तिची नोंद नाडिग्रंथलेखकाने आपणासाठी आगावूमध्येच करून ठेवल्याचे सांगितले जाते. वरील श्लोकांत ही नोंद पुढीलप्रमाणे आलेली आहे: नक्षत्र चित्रेत, मेष लग्नामध्ये शुक्र आणि मंगळ (मैयिन्मेल् कवि सय्); त्याच्यापुढे रवि (अदन्पिन् रवि); मिथुनेत बुध (मालुम्याळिल्); कर्केत गुरु (उयर्मन्नन् वयलदुविल्); सिंहेत राहू आणि शनि (करिरावेङ्गै) कन्येत चंद्र (मदिमङ्गै); कुंभेत केतु (सिगिहलसम्). ही ग्रहस्थिती ६ जून १९१९ मध्येही येणार नाही, अन् ६ जून २०३९ मध्येही येणार नाही. १९७९ मध्ये जून महिन्यातील ६ व्या दिवशी असलेली ही ग्रहस्थिती ही खरेतर त्या दिनी जन्मलेल्या जातकाच्या आयुष्याला 'साक्ष' देणारी ग्रहस्थिती आहे असे वर्णन नाडिग्रंथांतून येते, तर हीच तुमची पत्रिका होय असे प्रचलित भाषेमध्ये त्या जातकास सांगितले जाते. साध्या भाषेत सांगावयाचे झाल्यास, तुमचा जन्म ६ जून १९७९ चा आहे एवढेच जातकास सांगितले जाते. असो.

❒❒❒

# १६. लाल निळ्या रंगाचा इंगा!

तंजावूरच्या तमिळ युनिव्हर्सिटीचा भव्य प्रासाद
निवेदक – *विवेक चौधरी. ०७५८८८१६९४४.



तंजावूरच्या तमिल विश्वविद्यालयाचा भव्य प्रांगण. ओकसर व मी तेथील मॅन्युस्क्रिप्ट डिपार्टमेंटच्या हेडना भेटायला आम्ही जूनच्या घामफोडू गरमीत डॉ. अदियमान यांच्या ऑफिसचा शोध घेत दुसऱ्या मजल्यावर पोहोचतो; चौकटीच्या बुशकोटातील व्यक्ती म्हणती झाली, ' येस, व्हाट डू यू वांट?'

'कम टू मीट यू सार..' ओक सरांनी तमिळउच्चारांशी सलगी करत म्हटले.
'वोके. टेल...'

आम्ही काही लोक पुण्यातील इंडॉलॉजिकल विषयक अभ्यास करत आहे. काही हस्तलिखिते आम्ही मिळवली आहेत. त्याचे विश्लेषण करायला आपल्या विश्वविद्यालयात सोय करता येईल का यावर चर्चा करायला आपण थोडा वेळ द्याल अशी आशा आहे. कॉम्प्युटर वरील नजर न हालवता ते म्हणाले, 'लॉटाफ वर्का, नो टायिमा', कोलावेरी डी गाण्यातील ओळी आठवतील असा सूर धरून 'कोण कोण लोकांच्या पिडा' येतात. असा चेहरा करून ' हं बोला?' म्हणत कॉम्प बंद करून आमच्याकडे प्रथम नीटसे पहात म्हणाले, 'यू सेड मॅन्युस्क्रिप्ट?' ओक सरांनी मान हलवत म्हटले, ' आम्ही एक प्रॉजेक्ट हाती घेतला आहे. त्याचे प्रेझेंटेशन आम्हास दाखवता आले तर अनेक गोष्टी पटकन समजायला सोपे जाईल. ओके 'पाहू या' ते म्हणाले. ओकसरांना मी विचारले, त्यांच्या कॉम्पवर कि आपला
लॅपटॉप काढू ? का पेन ड्राईव्हवरून काढू या?'
'माझ्या कॉम्पवर नीट ऐकावयास येत नाही. दुसऱ्या ठिकाणी पाहू' डॉ. अदियमान उठत म्हणाले, 'व्हाटीज् टापिक?'

'नाडीग्रंथ पामलीफ एस्ट्रॉलॉजी!' ओक सरांनी सरसावून म्हटले.
**'ओह, नाडी या!' चेहरा आंबट करत ते उठलेले परत बसते झाले! म्हणायला लागले. 'आय नो नाडी अँडाल, दे आर फेक. नथिंग बट मनी अर्निंग बिझीनेस यू सी'. डॉ अदियमान आपल्या अनुभवाचे सार सांगायला सरसावले.** म्हणाले, 'मी एकदा मित्राने म्हटले म्हणून दोन घटकांचा वेळ दिला, तेंव्हा तात्काळ लक्षात आले की हे सगळे फेस रीडींगचे खेळ आहेत बाकी काही नाही. त्यात गोऱ्या कातडीचे काही भंपक लोक त्या नाडीमधे काही 'इसोटेरिक' असा समज करून घेऊन 'इंदियान पामलीफ सूदसेयर्स' म्हणुन त्यांच्या देशात जाऊन भाव मारतात. पण त्यात काही दम नाही'. डॉ. अदियमान यांनी एका दमात नाडीवरील मत व्यक्त केले.
आता ओक सर तो वार कसा झेलतात हे मला ऐकायला मिळणार म्हणून मी ही सरसावलो! ओक सरांनी संथ

आवाजात सुरवात केली. 'अगदी बरोबर. मी ही या नाडी विषयाच्या प्रकरणाचा पडदा फाश करावा म्हणून सरसावलो होतो. आजकाल झटपट पैसा कमवायची चटक लागलेल्या समाजात ही कीड उपटली गेली पाहिजे, असा माझा पवित्रा होता. शिवाय मी हवाईदलात असल्याने माझे अनेक तमिळभाषी सहकारी हाताशी होते. त्यांच्यामुळे व नंतर काही तमिळभाषा तज्ज्ञांच्या मदतीने मी ताडपत्रांतील लेखनाचा अभ्यासक म्हणून शोघ केला. नंतर जे काही सापडले ते मी आपल्यासमोर दाखवायला आणले आहे.'

'नाडीभविष्याबद्दल आपले व्यक्तिगतमत विरोधकाचे असले व वैयक्तिकरित्या हा विषय बंद करू इच्छित असलात तरी या विश्वविद्यालयातील तमिळ भाषेतील हस्तलिखिताच्या मुख्य प्रशासकाच्या खुर्चीत बसून नाडी हस्तलिखितांच्या मजकुराबाबत हा विषय बंद करणे योग्य ठरणार नाही.' ओक सरांचा सौम्य पण ठाम स्वर ऐकून ते पुढे काय म्हणतील अशी उत्सुकता लागली. तेवढ्यात डॉ. विवेकानंद गोपालन यांनी अदियमान यांच्या ऑफिसात प्रवेश केला. त्यांची थोडी तमिळमध्ये आव भगत झाल्यावर डॉ. विवेकानंदांना आपल्या बाजूने मत करायला ओढत ते म्हणाले, 'व्हाट डू यू से सार...? डॉ. अदियमान यांच्या सुरात सूर मिळवत डॉ.विवेकानंद म्हणाले, 'नाडीतील ज्योतिडम फेक (खोटे) असेल असे माझेही मत आहे. कदाचित म्हणून मी ते अनुभवले नाही म्हणून असेल, पण नाडी ताडपत्र हस्तलिखितातील भाषेविषयीचा अभ्यासक म्हणून त्यातील मजकुराकडे दुर्लक्ष करावे असे मी म्हणू शकत नाही. 'आय फील वी आर ओपन दॅट वे. व्हॉट डु यू से सर?'




त्यांच्या बोलण्यास सूर मिळवत डॉ. अदियमान म्हणाले, ' येसस, शो योर प्रॉग्रेम'. ओकसर मला उद्देशून म्हणाले, 'विवेक आपण त्या ऐवजी मेहतांची डॉक्युमेंटरी दाखवू या.'

आमची तयारी झाली. डॉक्युमेंटरीतील ताडपट्टीवरील नावांच्या कूटतमिळ अक्षरांवरून लाल रंगाची जाडसर रेषा प्रत्येक अक्षरला उठावदार करत दिसू लागताच उदय, प्रमिला, मुकुटुलाल व शेवटी प्रीती अशी स्पष्टपणे दिसू लागली. त्यानंतर ती नावे कोणास उद्देशून आहेत याचे स्पष्टीकरण दाखवणाऱ्या निळ्या रंगाने आपली करामत दाखवायला सुरवात केली. उदय हेच या व्यक्तीचे नाव, आईचे प्रमिला तर वडिलांचे मुकट्टलाल असा तमिळ उच्चार त्यांच्या वडिलांच्या नावाचा व पत्नीचे नाम प्रीती, प्रला दीर्घ वेलांटी असून उच्चार प्रि (ह्रस्व) असा नसून तो प्री(दीर्घ) अशी नावांची नाते संबंधदर्शक शब्दरचना पाहून डॉक्युमेंटरी संपताच आश्चर्याने त्यांच्या चेहर्याचवरील भाव बदललेले होते!

ओक सरांनी मग कार्यशाळा २०११ मधील राजेंद्र पाठकांनी उदय मेहतांच्या इंग्रजीतील मुलाखतीतील त्यांच्या स्वतःच्या व घरच्यांचे नामोल्लेखाचा ताडपट्टीतील लेखनाला करून दिलेला दुजोरा व त्यांच्या उच्चशिक्षणातील पदव्या व भूषवलेली पदे वगैरे संभाषणाचा भाग ऐकून ओकसरांच्या बोलण्यात बरेच तथ्य असल्याचे कबूल केले! तोवर मी नाडी ग्रंथातील वहीतून मिळवल्या कथनांवर आधारित प्रोग्रॅमची जुळणी करून ताडपट्ट्यातील कथनांचे केलेले वर्गीकरण, फोटो, ऑडियो कॅसेटवरून एम पी३ फाईलवरील भाषांतराची सोय दाखवली. नमुन्यादाखल केलेले तमिळभाषेतील डीटीपी वर्क दाखवले. अशा स्कॅन्सची संख्या काही काळात काही हजारावर जाईल तेंव्हा या सर्वाला तमिळ स्क्रिप्ट मधून सादर करायला आपल्याकडून मदत व्हावी आणि इंडॉलॉजिकल शोधकर्त्यांना हजारो नाडी कथनांचा डेटा उपलब्ध व्हावा असे वाटून डॉ. विजय भटकर या नामांकित शास्त्रज्ञ व भारतीय प्रथम
सुपर कॉम्प्युटरचे जनक यांनी प्रयत्न करायला प्रोत्साहन व त्यांच्या मल्टिव्हर्सिटीतर्फे आम्ही आपल्याला संस्थागत सहकार्य करायचे निमंत्रण घेऊन आलो आहे. तेंव्हा तंजावूरच्या तमिळ विश्वविद्यालयातर्फे आपली सहमती हवी आहे. तसे लेखी 'मेमोरॅन्डम ऑफ अंडरस्टॅन्डीग' चे पत्रही मी तयार केले आहे'. ओक सरांच्या उत्साहाला आवर घालत, 'नको, नको इतकी घाई नको. 'डॉ. अदियमान यांची सावध प्रतिक्रिया आली. ती ओकसरांना अपेक्षित असावी. कारण ते म्हणाले, 'बरं, सुरवात म्हणून ५० स्कॅनिंगचे तमिळ डीटीपी करून देतो ते घ्यावे. तोवर आम्ही नमूना म्हणून केलेल्या कामात काही त्रुटी असतील तर त्यावर प्रकाश टाकावा'.

'हो तसे करता येईल ना, पण काय आहे, हे काम आमच्या ऑफिसच्या रामरगाड्या व्यतिरिक्त म्हणून करावे लागेल त्याला काही फी द्यावी लागेल. शिवाय असेही करता येईल की आम्ही काही सॅंपल्स मिळवता येतात का ते पाहू. त्याची तपासणी करून तसे ऑफिशियल प्रमाण पत्रही देता येईल'. डॉ. अदियमान यांच्या बदललेल्या रंगामुळे ओकसरांनी आनंदू म्हटले, 'तसे रीतसर प्रमाणपत्र मिळाले तर फारच छान!'

'सुरवातीला १० स्कॅन पाठवा. जास्त नको. करायची बरीच कामे पड़लीत, म्हणत डॉ. अदियमान आपल्याला ऑफिसमधे घुसत दिसेनासे झाले. मग आम्ही त्या भव्य प्रासाद वास्तूतून डॉ. विवेकानंद यांच्यासह परतताना ओक सर डॉ. विवेकानंदांना मराठीत म्हणाले, 'सर आपण तमिळ भाषेचे व मोडी लिपीचे मान्यवर अभ्यासक आहात. तमिळनाडूत जन्म होऊन ही आपण मराठी भाषेतून सुंदर संवाद साधता. आपण पुण्याच्या डेक्कन कॉलेजात मोडी लिपीवर शोधकार्य करून पीएचडी मिळवली आहेत. याचा आम्हाला अभिमान आहे. शिवाय सध्या आपण बंगलोरजवळील एका विश्वविद्यालयाचे भाषांतर व हस्तलिखित विभागाचे प्रमुख म्हणून काम करता त्यामुळे आपण व्यक्त केलेले मत डॉ. अदियमान यांनी मुकाट्याने मान्य केले. म्हणून उदय मेहतांची ती चित्रफीत आम्हाला आपणांस दाखवता आली. सर, आपण आपल्या विश्वविद्यालयातही अशा नाडी हस्तलिखितावर शोधकार्य करायला प्राधान्य द्यावे.' हो जरूर, म्हणून त्यांनी मान्यता दर्शवली.
त्या परिसरात काही फोटो काढून आम्ही परतलो. ....
.... त्या नंतर दुसऱ्या दिवशी तंजावर संस्थानाचे 'प्रिन्स ऑफ तंजावर' असे नामभिधान धारण करणारे सरफौजीराजे भोसले यांचे सध्याचे वंशज प्रिन्स शिवाजी

यांच्या सरस्वतीमहालाच्या मागील गढीवजा इमारतीच्या पहिल्या मजल्यावर भेटायला ओक सरांना डॉ. विवेकानंद घेऊन गेले. त्यावेळी झालेल्या चर्चेत नाडी ग्रंथांच्या विषयी ओक सरांशी विचार व्यक्त करताना प्रिन्स शिवाजी राजे म्हणाले, 'काही म्हणा बुवा, पण मला त्या नाडीपट्यात काही भविष्य असेल असे वाटत नाही.' त्यावर डॉ. विवेकानंदांनी आधी पाहिलेल्या चित्रफितीचा उल्लेख करून ओक सर म्हणाले, 'आपण म्हणता ते ठीक, भविष्य कथन असते का नसते यावर तेंव्हा प्रकाश पडू शकतो जेंव्हा त्यात काय लिहिले आहे ते तमिळ भाषातज्ज्ञांकडून समजून घेतले गेले तर?'

'तेच काम हाती घ्यायला आम्ही डॉ. विवकानंद व डॉ. अदियमान यांना विनंती करायला आलो आहोत. ती त्यांनी मान्य केली आहे. आता यापुढे ते कसे सहकार्य करतात यावर बरेच अवलंबून आहे!

कार्यशाळा 'नाडीग्रंथावर प्रकाश (**Workshop - 'Focus on Naadi Granthas'**) या अंतर्गत तमिळनाडूमधे काही लोकांना भेटी दिल्या गेल्या त्यातील काही भेटींतील अनुभव सादर.

*विवेक चौधरी. नाडीग्रंथप्रेमी व या शोधयात्रेतील शशिकांत ओक सरांचे सहचारी

❑❑❑

## महर्षी भगु यांचे आशीर्वाद




भृगु आश्रमाचे द्वार



बाबाजींचे आशीर्वाद गुरूजी संजय आणि गुरूमाता डोलमा अग्रवाल यांना

काकभुजंदर जीवनाडी कथनात म्हटल्याप्रमाणे भृगुमहर्षींच्या आशीर्वादासाठी लॉसएंजल्स, कॅलिफोर्निया, अमेरिकेतून आलेल्या भृगुवक्ता संजय अग्रवाल यांच्या ३० शिष्य गणांसह आले होते. त्यांच्या समावेत हरिद्वारच्या आश्रमात ज्यांना मानवी रूपातील साक्षात भृगु मानतात त्या माता ब्रह्मज्योती बाबाजी यांचे आशीर्वाद प्राप्त झाले. त्यांचा उत्तरकाशीच्या भेटीचा कार्यक्रम आयत्यावेळी रद्द झाला आणि अगस्ती मुनींचा आश्रम हिमालयात कुठे शोधायचा असा पेच पडला. पण घटनाचक्र असे फिरले की हरिद्वार ते अजमेर रेल्वेत ऐत्यावेळी आरामात जायची सोय झाली आणि पुष्करच्या पहाडी भागात अगस्त्य गुफा असल्याचे लक्षात आले.

## १७. आपणाकडून माहिती काढून तीच आपणाला प्राचीन ताडपट्टीतून सांगत असल्याचा बहाणा करण्यात येतो. – या संशयाचे निराकरण

हा संशय नेहमीच घेतला जातो. या संषयातच त्याचे उत्तर लपलेले आहे. ते असे की – आपणाकडून विविध मार्गांनी माहिती काढून तीच माहिती नाडी शास्त्री आपणाला सांगतो. याचा अर्थ आपण सांगितलेली सर्व माहिती लक्षात ठेऊन तेच भविष्य म्हणून तो आपल्याला सांगतो.

**सत्यता काय आहे?**

सत्यतेत तो ती नाडी ग्रंथांच्या ताडपट्टीतील मजकूर वाचून दाखवत असतो. जेंव्हा आपणांस तो पट्टी वाचून त्या पट्टीच्या अनुशंगाने विचारतो की तुला दोन भाऊ व एक बहीण आहेत का? आपण हो किंवा नाही म्हणतो. त्यामुळे आपणाला असे वाटते की आपल्याला प्रश्न विचारून उत्तरे मिळवली जात आहेत. वस्तुतः त्याची विचारणा अशी असते की आत्ता माझ्या हातात असलेल्या पट्टीतील वर्णनाच्या व्यक्तीला दोन भाऊ व एक बहीण आहे तसे तुमचे आहे का? असेल तर हो म्हणा नसेल तर नाही म्हणा.

नाही म्हणाला तर ती पट्टी खाली ढकलून पुढची वाचून त्या पट्टीतील मजकुराच्या अनुशंगाने प्रश्न विचारले जातात. त्यावेळी तो कधी भावाबहिणांचा उल्लेख सोडून अन्य विचारणा करतो. असे करत करत एका पट्टीतील मजकूर तो इतका तंतोतंत येतो पण प्रथम पहाणाऱ्याला त्याचा अर्थ तो त्या विवक्षित नाडीपट्टीत पहाण्याचे सोंगकरून आपणाकडून काढलेली माहिति परत आपणांस सांगतो असे वाटत राहते.
आपणांस हे मान्य होईल की त्याने सांगितलेली माहिति मौखिक असल्याने ती सांगता क्षणी हवेत विरुन जाईल. म्हणजेच त्याची शहानिशा करता येईल असा पुरावा राहणार नाही. पण जर ती माहिती नाडी ग्रंथाच्या पट्टीतून सांगितली नव्हे वाचली जात असेल तर तो लेखी पडताळा येईल असा पुरावा म्हणून मिळवता येईल. तो पुन्हा-पुन्हा तपासायला येणे ही शक्य आहे. त्यामुळे ज्या एका नाडीवाचकाने प्रश्न विचारून त्या विवक्षित नाडी पट्टीचा शोध घेतला त्याच्या ऐवजी तीच नाडी पट्टी जर एका अशा अन्य वाचकाने वाचली की ज्याचा आधीच्या नाडीवाचकाने मिळवलेल्या माहितीशी अजिबात संपर्क नव्हता तर त्या नाडीवाचकाला त्यातून एक तर काहीच मजकूर वाचता येऊ नये कारण नाडीपट्टीत काहीच मजकूर नसतो असा काहींचा दावा असतो किंवा मजकूर वाचता आला तरी त्याने ग्राहकाला प्रश्न विचारून काढलेली माहितीशी संपर्क नसल्याने त्याला तीच माहिती सांगता येणे कदापिही शक्य नाही. तसेच एकाच नाडी पट्टीचे वाचन दोन किंवा अनेक त्याच किंवा वेगवेगळ्या नाडी केंद्रातील नाडीवाचकांनी केले तर ते एकदम वेगवेगळे यायला हवे. पण ते तसे होत नाही. ते एकच येते!

याचा प्रत्यय असाही घेता येतो की मोठया नाडी केंद्रातून कामाच्या वाटणीमुळे नाडी पट्टीचा शोध एक नाडीवाचक घेतो तर दुसरा त्याच ताडपट्टीतील मजकूर ४० पानी वहीत लिहून काढतो. तर तिसरा वहीतील मजकूर वाचून त्याचे भाषांतर टेपकरून कॅसेटमधे रुपांतर करायला बसतो.

त्यामुळे अशा प्रकारची चाचणी आपण ठरवून न मागताच, आपूसूक होताना आपणांस प्रत्यक्ष डोळ्यानी पहायला मिळते. नाडी केंद्राच्या प्रथेप्रमाणे ग्राहकाने त्याच्या माहितीशी तंतोतंत जुळत असल्याचे मान्य केल्यावर नाडी शास्त्रीं त्या विवक्षित नाडपट्टीतील कूट तमिळ मधील मजकूर ग्राहकाला जरी तमिळ येत नसेल

तरी सध्याच्या तमिळभाषेतून एका ४० पानी वहीत लिहून दिला जातो. त्याशिवाय त्याला ४० पानी वहीतील मजकूर वाचून त्याचे त्याला हव्या त्या भाषेत रुपांतर करून त्याच्या भविष्याची कॅसेट- टेप व काही केंद्रांतून सीडी त्याच्या सुपुर्त करतात हे आपण अनुभवले असेल. आता असे पहा की जर आपल्याकडून विचारुन काढलेली माहिती जर त्याच पट्टीचे दुसऱ्या नाडीवाचका कडून वाचून घेतली आणि जर तीच माहिती त्याने त्यापट्टीतून वाचून दाखवली तर या आक्षेपातील हवा निघून जाते. त्यामुळे शेवटी ज्या पट्टीत आपण हो-हो म्हणून सांगितलेला मजकूर खरोखरचा कोरलेला असतो का? हे तपासणे अत्यंत महत्वाचे होते. अशी तपासणी सामान्यांना, विशेषतः तमिळेतरांना सहज शक्य होत नाही म्हणून आपल्या सारख्या मराठी लोकांचा संशय आधिक बळावतो.

नाडी ग्रंथ विरोधात प्रचार करणाऱ्या लोकांनी नाडी पट्यातील तमिळ मजकुराची तशी तपासणी करावी व त्यांचा पुरावा लोकांपुढे ठेवावा.

आम्ही तशी पट्ट्यातील मजकुराची तपासणी करणार नाही कारण तशी करण्याची गरज आम्हाला नाही, कारण आम्ही फक्त तर्कानेच नाडी भविष्य थोतांड मानतो असे म्हणणाऱ्यांशी चर्चा करून काय उपयोग.

मी असे शोध कार्य स्वतंत्ररित्या केलेले आहे. नाडीपट्ट्यांचे फोटो काढून, स्कॅनिग करून त्यांचा अभ्यास नाडी केंद्रांशी संबंध नसलेल्या व तमिळभाषातज्ञ व्यक्तींकडून वेळोवेळी करून घेऊन मग माझी खात्री झाल्यावर की त्या ताडपट्ट्यात खरोखरच भविष्यकथनाचा मजकूर असतो. मी माझे मत मांडत आलो आहे. मी त्याचा पुरावा म्हणून दोन वेगवेगळ्या नाडी ग्रंथाच्या पट्यातील एका विवक्षित नावाचा पुरावा माझ्या पुस्तकातून सादरही केला आहे. तो अध्यापही कोणा तमिळेतर किंवा तमिळतज्ञांनी खोडून काढलेला नाही. उलट मिसळपाव या साईट वरून मराठी पण तमिळ जाणकारांनी ती नावे शशिकांत असल्याचा पुरावा मान्य केला आहे. पैकी एक हैयोहैयैयो या उपनावाने लेखन करणाऱ्यांनी या पुढे जाऊन ताडपट्यातील कुट लिपीवर तज्ञ म्हणून भाष्य केलेले आहे. ते ही यावर प्रकाश पाडते.

आपण ही असा पुरावा गोळा करु शकता व आपले मत स्वतंत्रपणे मांडू शकता.

वर म्हटल्या प्रमाणे या आक्षेपातच त्याचे उत्तर लपलेले आहे. नाडी शास्त्री भविष्य सांगत नसून ताडपट्टीतील मजकूर वाचून दाखवत असतो. तो इतका तंतोतंत जुळणारा असतो की त्यामुळे आपला संशय बळावतो इतकेच.

शिवाय जर एखाद्याला फसवायचे असेल तर तो ग्राहकाच्या हातात असा कुठलाच पुरावा हाती लागू देणार नाही की त्यामुळे तो पकडला जाईल. पण नाडी ग्रंथांच्या बाबत नेमके उलटे आहे. **आपणांस वहीच्या रुपाने पुरावा आपल्याला टेपसकट आवर्जून दिला जातो.**

त्याची शहानिशा करणे आपल्या हातात आहे.

त्यामुळे हा मजकूर जर खोटारडेपणा न करता खरोखरच नाडी ग्रंथातून येत असेल तर त्याची उत्पत्ती मानवी बुद्धीच्या कक्षेच्या बाहेरील असली पाहिजे असे म्हणणे प्राप्त होते. पर्यायाने **अतींद्रिय शक्तींतून ती माहिती झाली असली पाहिजे असे नाइलाजाने मान्य करावे लागते.**

बुद्धिवाद्यांचा मग वैचारिक पायाच कोसळतो म्हणून त्यांना ते तत्वतः मान्य करणे शक्य होत नाही. मग त्यांना काहीना काही सबबीसांगून नाडी पट्ट्यांची शहानिशा करण्याचे टाळावे लागते.

अशा फक्त गणिताने वा तर्काने नाडी ग्रंथांना थोतांड सिध्द करु पहाणाऱ्यांशी चर्चा करून उपयोग नाही

❐❐❐

## १८. नाडीग्रंथ ताडपट्टीच्या त्या फोटोचे इतके महत्व ते काय ?



ओळखा पेनचे टिप न लावता एकूण किती ओळी आहेत ते.

नाडी ग्रंथांच्या ताडपत्रावरील मजकुराबाबत चर्चेचा विषय लाऊन धरलेला काही वाचकांचा अपवाद सोडता फारसा विचारात घेण्यासारखा किंवा वैचारिकतेने आनंददायी वाटत नाही.

याचे कारण म्हणजे त्यांची ज्योतिषशास्त्राबाबत नकारात्मक मते आहेत. त्यांच्या वैचारिक बैठकीमुळे फलज्योतिषाला वा अन्य भविष्यकथनाच्या विधांना विरोध करणे स्वाभाविकपणे घडते. अशा मनोधारणेतून त्या लोकांना नाडी ग्रंथ हे भविष्यकथनाचा प्रकार असल्याने ते थोतांड असणार असे खात्रीपुर्वक वाटते वा मानावेसे वाटते. त्यामुळे या विषयावर अनेकांच्या अपेक्षित प्रतिक्रिया आल्या.

नाडी ग्रंथांवरील लेखनातून त्यातील ताडपट्टीतील मजकुरातून जे काही लेखनकार्य भविष्यकथन म्हणून केले गेलेले आहे. त्याला सध्या गौण महत्व देऊन नाडीग्रंथांतील ताडपट्ट्यांचा अभ्यास करण्यासाठी खरेतर नकारात्मक विचारांची बैठक असलेला गटच अभ्यासपूर्ण कार्य करू शकतो. आणि त्यासाठीच जर कोणी भारतात किंवा परदेशातील तज्ञ मदतीचा हात पुढे करत असेल तर त्यांची मदत होऊ शकेल.

तसे पाहिले तर 'या फोटोत काय दडलय?' विचारणेत तो फोटो व त्या सोबतचे स्पष्टीकरण वाचून-पाहून हा फोटो फार महत्वाचा पुराचा आहे किंवा असेल असे सामान्यतः वाटत नाही हे खरे. ते बरोबरही आहे. काय लावलय हे ओकंनी नाडीपुराण असा सामान्य वाचकांचा ग्रह होणे स्वाभाविक आहे. तथापि जी शंका उपस्थित केली गेली त्याचे निराकरण करणे आगत्याचे ठरते. मात्र खोलवर विचार केल्यावर ही बाब वाटते तितकी हलकी फुलकी किंवा टाळून विचारावेगळी करायला येत नाही असे लक्षात येते. ते कसे तर ऐका तर -

पण आता खालील विचार नीट वाचल्यावर त्यातून विविध आक्षेपांच्या संदर्भात काय काय उपस्थित होते याची झलक मिळेल.

पहिला आक्षेप असा असतो की या ताडपट्ट्यात काहीही लिखाण कुठल्याही भाषेत केलेले नसते. त्या कोऱ्याच असतात. भासवले असे जाते की नाडीवाचक त्यात पाहून त्यातील मजकूर वाचतो आहे. उत्तर - आता त्या ताडपट्ट्या कोऱ्या असतात की कि काहीतरी का होईना लिहिलेल्या असतात हे शोधणे हे

काम केले पाहिजे. ते काम नाडी भविष्य केंद्रातजाऊन प्रत्यक्ष शोधकरून त्यांच्याकडील उपलब्ध ताडपट्ट्या पडताळाव्या लागतील. प्रस्तूत लेखकाने असे अभ्यासकार्य केले आहे. तसे केले असता त्या संपूर्णतः कोऱ्या नसतात. त्यावर मजकूर लिहिलेला असतो. हे लक्षात येते. त्यामुळे या आक्षेपातील खोटेपणा सिद्ध होतो.

दुसरा आक्षेप असा असतो की चर्चेसाठी जरी त्या ताडपट्ट्यात मजकूर असतो असे मानले तरी त्यातून नेमकी कुठली भाषा असते याचा अर्थबोध होत नाही.
उत्तर - यावर सोपे उत्तर असे की सध्या जे नाडी ग्रंथ पट्टीवाचनाचे काम करतात ते सर्व तमिळभाषी आहेत. ते यातील मजकूर वाचून दाखवतात अणि तो मजकूर परत एका ४० पानी वहीत सध्याच्या प्रचलित तमिळ लिपित पुन्हा लिहून काढतात. यावरून त्या मजकुराची भाषा तमिळ का अन्य कोणती असावी याची खात्री करता येते. या उलट ताडपट्ट्यांचे वाचन करणारे तमिळभाषिक सोडून अन्य भाषिकांतर्फे होते वा केले जाते असा पुरावा उपलब्ध करावा लागेल. तो होत नाही. आक्षेप असा खोडून निघतो.

तिसरा आक्षेप असा की जरी मानले की ताडपट्टी मजकूर लिहिलेला असतो. त्याची भाषा तमिळ असते तर ती सामान्य तमिळ भाषिकाला का वाचायला येत नाही? त्या अर्थी नाडीपट्टी वाचन हा एक तमिळ नाडीवाचकांचा देखावा असतो.
उत्तर - असे लक्षात येते की सामान् तमिळभाषिकांना या ताडपट्ट्यांवरील मजकूर वाचायला येत नाही किंवा आला तरी अर्थबोध होत नाही. याचे मराठी भाषिकांना पटेल असे स्पष्टीकरण असे की ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मराठी भाषेत लिहिला गेला आहे. तरीही त्यातील छापील मराठीतील ओव्यांचा अर्थ सर्वसामान्य मराठी समजणाऱ्याला समजायला कठीण जाते. आता तीच ज्ञानेश्वरी जर मोडी भाषेत लिहून सध्याच्या मराठी वाचकाला दिली तर त्याची काय अवस्था होईल? त्याला नेमके काय लिहिलेले आहे याचा अर्थ बोध होणार नाही पण कोणी ती मोडी लिपि-भाषातज्ञ वाचायला लागले तर थोडा थोडा अर्थ कळेल. तोच अर्थ ज्ञानेश्वरीचा अभ्यास केलेल्या जाणकार मंडळींनी फोडकरून सांगितला की 'ओहो, असा अर्थ आहे!' असे उद्गार ओठी येतील. नेमके तेच सामान्य तमिळ भाषिकांचे होते असे अभ्यास करता जाणवते. त्यामुळे या आक्षेपात काही तथ्य नाही. हे लक्षात येते.




२ तमिळभाषा संशोधकांनी पट्टीतील नाव कसे दिसते याचा अभ्यासपुर्ण फोटो

आक्षेप चौथा असा की सामान्य तमिळांना जरी ती वाचता आली नाही तरी ती तमिळ भाषातज्ञांनी तरी वाचून कुठे मान्य केली आहे?
उत्तर - या तऱ्हेचे अभ्यासकार्य अनेक वेगवेगळ्या तमिळ भाषा तज्ञांकडून विविध ठिकाणी झाले आहे. तथापि अजूनही त्यांच्याकडून ते आणखी पद्धतशीरपणे व्हावे यासाठी प्रयत्न करणे जरूरी आहे. श्री लंकेतील डॉ. अरसे कुलरत्ने अणि लंडनस्थित डॉ. एस. संबंधम

या दोघांनी अत्यंत परिश्रमपुर्वक एक अभ्यास निबंध सन २००२ मधे लिहून प्रकाशित केला. त्यात त्यांच्या शोधाचा महत्वाचा भाग होता की खरोखरच नाडीच्या ताडपट्ट्यात त्यांच्या संबंधातील नावे कोरलेली होती.त्यांनी तो शोध निबंध आभिप्रायार्थ पुनर्जन्मावर आयुष्यभर काम केलेल्या डॉ. आयन स्टीव्हन्सन यांना अमेरिकेत पाठवला होता. त्यात त्यांनी असे म्हटले होते की मी यावर तत्वतः विश्वास ठेऊ शकत नाही. तरीही असा नाडी ग्रंथांचा पुरावा खरोखर असल्यास तो अविश्वसनीयच नव्हे तर सध्याचे प्रस्थापित शास्त्राचे नियम उलथुन टाकणारा आहे असे सिद्ध होईल. तथापि यावर आणखी अभ्यास कार्य करावे लागेल.

या पुराव्यांच्या संदर्भात विशेष उल्लेख करावा लागेल की नाडी ग्रंथ भविष्याच्या दि १४ ऑक्टोबर २००७ साली पुण्यात झालेल्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्षपद चेन्नईच्या इन्स्टिट्युट ऑफ एशियन स्टडीज या तमिळ भाषेतील इंडॉलॉजीवर काम करणाऱ्या व विशेषतः ताडपत्रांच्या ग्रंथांवर शोधकाम व त्यांचे संरक्षण करणाऱ्या संस्थेच्या संस्थापक, चालक डॉ. जी जॉन सॅम्युएल यांनी स्वीकारले होते. त्यांच्या सोबत त्याच संस्थेच्या ताडपत्रशोध विभागाच्या प्रमुख तमिळतज्ञ श्रीमती लक्ष्मी यांनाही बोलावले गेले होते. त्यांनी उपस्थितांसमोर त्या पट्टीतील अणि अन्य एका नाडीपट्टीतील मजकूर व विशेषतः नावे वाचून ती खरोखरीच ताडपट्टीत कूट तमिळ भाषेत कोरून लिहिलेली आहेत असा असल्याचा निर्वाळा दिला.

जर्मनीत थॉमस रिटर नावाच्या एका नाडी भविष्यावर जर्मन भाषेत पुस्तके लिहिलेल्या व्यक्तीने तेथील तमिळ भाषेतील तज्ञाकडून नाडी ग्रंथ भविष्य ताडपट्टीतील मजकूर वाचून तो भविष्य कथन सोडून अन्य धार्मिक लेखन नसल्याचा निर्वाळा दिला असा उल्लेख त्यांच्या ''द सीक्रेट ऑफ इंडियन पामलीफ लायब्ररीज पुस्तकात केलेला आहे.

यापुढे जाऊन त्या ताडपट्ट्यात व्यक्तीच्या अन्य तपशीलाचे उल्लेख, कसे असतात याचा अभ्यास करून या ताडपट्यांचे फोटो मिळवून यावर आणखी कार्य होणे अपेक्षित आहे.

आक्षेप पाचवा असा की नाडी ग्रंथ भविष्य सध्याच्या प्रचलित विज्ञानाच्या विरोधात जात असल्याने त्याला कितीही पुराव्यांनी सिद्ध करण्याचा प्रयत्न निष्फळ आहे.

उत्तर - मान्यता आहे की सामान्यपणे व्यक्तीचे नाव त्याचे आईवडील किंवा वरिष्ठ नातलग ठरवतात व विधिपुर्वक ठेवतात. पण जर या ताडपट्याच्या मजकुरात व्यक्तीचे नाव व अन्य माहिती त्याने ती न पुरवलेली असता, त्याच्या जन्माच्या आधीपासून केंव्हातरी लिहून तयार असेल तर त्याला काय म्हणायचे? त्याची संगती कशी लावायची? ती संगती मानवी बुद्धीच्या स्तरावर लावता येत नसेल तर त्याला मानवी विज्ञानाच्या कक्षेबाहेरील म्हणजेच इंद्रीयगम्य ज्ञानाने ज्ञात न होणाऱ्या अदभूत शक्तीचा विलास किंवा लीला मानावे लागेल. कदाचित त्रिमितीच्या पलिकडे सध्या अज्ञात अन्य मितींच्या ज्ञानात त्या गूढाचे उत्तर सामावलेले असेल. भूत, वर्तमान आणि भविष्यकाळ असा आपण करतो तसा भेद न करता काही गोष्टी घटना ज्ञात करता येऊ शकतात याचा शोध घ्यावा लागेल. मात्र नाडी भविष्य थोतांड मानून त्याच्याकडे जाणीवपुर्वक दुर्लक्ष करून असे म्हणत बसायचे की जर आम्हा विज्ञानवाद्यांनी नाडी ग्रंथांच्या या सत्यतेला तत्वतः मान्यता दिली तर आमच्या वैज्ञानिक दृष्टीकोनाचा पायाच निखळून पडतो म्हणून आम्हाला नाडी ग्रंथांच्या अस्तित्वाची दखल घेणे मान्य नाही. ही तर वैज्ञानिक विचारांशी प्रतारणा नव्हे काय?

# १९. महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती ही एक सर्कस आहे... इति – बोध अंधश्रद्धेचा...




नाडीग्रथांवरील माझे लेखन वाचून सांगलीच्या श्री कुंभोजकरांनी कळवले की डॉ. जयंत नारळीकरांना आम्ही मानतो. त्यांचे मत आपण घ्यावे. त्यांनी जर नाडीभविष्याच्या अदभूततेला मान्यता दिली तर आमच्या सारख्यांना आपल्या लेखनावर विश्वास ठेवायला सोईचे जाईल. त्यांच्या प्रतिक्रियेचा मान ठेवून मी डॉ. नारळीकरांची प्रत्यक्ष भेट घेऊन त्यांना माझे 'चक्रावून टाकणारा चमत्कार – नाडी भविष्य' पुस्तक सप्रेम भेट दिले. त्यांनी मला आपला नकारात्मक अभिप्राय लेखी कळवून व अंनिसला त्या पत्राची प्रत पाठवून या विषयाची बोळवण केली.

त्यानंतर अंनिसचे कार्यवाह डॉ. दाभोळकरांनी पत्रव्यवहारातून, दै. पुढारी, अंनिवार्तापत्रातून भले मोठे लेख लिहून व चर्चा, सभा आयोजित करून हा विषय अंनिसच्या मुख्य कार्यावळीवर ठेवला. नंतर ज्योतिषशास्त्राच्या संदर्भातील अंनिसचा गड सांभाळणाऱ्या त्यांच्या दोन शिलेदारांनी पुढे लेखन कार्य चालू ठेवले. फारच गवगवा झाल्यावर ओंकार पाटील नामक व्यक्तीने तांबरमच्या नाडीकेंद्रास भेट देऊन नाडी भविष्यावर अंनिसची ऑफिशियल मतमांडणी केली. त्यावर पुस्तक ही प्रकाशित झाले.

एका बाजूला हे सर्व होत असताना ठाण्याच्या डॉ. विजय बेडेकरांनी अंनिसच्या विविध प्रकरणांतील खरेखोटेपणावर प्रकाश टाकणारे 'शोध अंधश्रद्धेचा' नावाचे पुस्तक प्रकाशित केले होते. नाडीग्रंथ भविष्यावरील प्रकरणात अंनिसशी झालेला प्रदीर्घ पत्रव्यवहार व अन्य लेखनावर आधारित एकूण ७० परिशिष्ठांनी गच्च भरलेला आहे. तो पाहून त्याचे पुस्तकात रुपांतर करणे ही ऐतिहासिक गरज आहे असे वाटून त्यांनी प्रकाशन करायचा निश्चय केला व २६ जानेवारी १९९९ ला 'बोध अंधश्रद्धेचा अर्थात नाडी भविष्यने केला अंनिसचा पराभव' या उपशीर्षकाचे पुस्तक तयार झाले. (किंमत १५० रुपये.) त्याची एक प्रत दाभोळकरांना दिली गेली. त्यानंतर त्यांनी लिहिलेल्या पुस्तकात या पुस्तकातील माझ्या लेखनाची दखल तिरकसपणे उल्लेख करून घेतली गेली. मात्र त्यानंतर ते वा त्यांचे चेले नाडी ग्रंथांच्याशी आपले काही देणे घेणे नाही असे दाखवून आहेत.

आपण (दाभोळकर) या सर्कसचे रिंगमास्टर असल्याने, माझ्या रिंगणात या, मग मी तुम्हाला कसा लोळवतो ते पहा असा आपला पवित्रा तुमच्या दृष्टीने शास्त्रीय पायावर आधारित पण भविष्यकाळात कसेही करून अंग काढून पसार व्हायला सोईचा आहे. डरकाळ्या फोडणारे आवाज आपण वेळोवेळी साताऱ्यात बसून काढता! आपल्या 'अंनिस सर्कस' चालायचे दिवस आता फार जिकिरीचे झाले आहेत.

'बोध अंधश्रद्धेचा' पुस्तकाच्या मागील कव्हरवरील खालील मजकूर सर्व सांगून जाईल. खरे तर मला याबाबत आणखी लिहायला रस नाही. तरीही या लेखमालेचा भाग म्हणून मी या पुस्तकाच्या संदर्भातील छोटी झलक दाखवतो. अर्थात वाचकांना या विषयावर अधिक माहिती माझ्या या पुस्तकातून उपलब्ध होईल. ती त्यांनी वाचावी ही विनंती.

■ महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती ही एक सर्कस आहे. आपण (दाभोळकर) या सर्कसचे रिंगमास्टर असल्याने, माझ्या रिंगणात या, मग मी तुम्हाला कसा लोळवतो ते पहा असा आपला पवित्रा तुमच्या दृष्टीने शास्त्रीय पायावर आधारित पण भविष्यकाळात कसेही करून अंग काढून पसार व्हायला सोईचा आहे.तथापि, या इथे नाडी भविष्यकर्ते महर्षी हे रिंगमास्टर आहेत! भविष्याच्या आसूडाला तो थोतांड म्हणून आव्हान देऊन आपण रिंगणात उतरला आहात! वर्तमानपत्रातून परिपत्रके काढून व लेख लिहून मला मधे घालून, पहा या रिंगमास्टरची कशी ऐशी की तैशी करतो! नाहीतर ५ लाख देतो! असे डरकाळ्या फोडणारे आवाज आपण वेळोवेळी साताऱ्यात बसून काढता! मात्र मद्रास भागातील नाडीकेंद्रास भेटी देण्याचे नाव काढत नाही. कारण तेथे जाऊन पराजित झाल्यामुळे अंनिसला व पर्यायाने आपल्याला तोंड काळे करुन घ्यायचे नाही!

■ आपल्या 'अंनिस सर्कस' चालायचे दिवस आता फार जिकिरीचे झाले आहेत. प्रवीण कसरत पटू शिष्यगण आपणांस सोडून गेले आहेत. इतर शिलेदारांनाही आपल्या आसुडाचा बेगडीपणा लक्षात आला आहे. वर्तनामानपत्रवाले एकजात आपल्या विविध कृत्यांना आपल्यामागे कुत्सितपणे हसून नावे ठेवतात. मात्र तोंडावर व वर्तमानपत्रात नावे ठेवायला आपल्या सर्कसचा दरारा मोठा असल्याने टाळतात. पण जे आपल्या कल्पनाविश्वात तल्लीन असतात अशा आपणांस हे लक्षात आलेले नाही...

■ नाडी भविष्याबाबत आपल्या समितीचे मद्रासला पानिपत (वॉटर्लू) होणार हे ओळखून आपण तिकडे गेला नाहीत तरी न जाताच स्वतःच्या घरी (महाराष्ट्रात) न जाण्यानेच तिचे पानिपत झाले आहे. समितीचा मुकुट येथेच धुळीला मिळाला आहे ...

■ अपरोक्ष वाद घालण्यापेक्षा पुण्या-मुंबईत, उभयतांच्या सवडाने केंव्हाही एका व्यासपीठावर वाद-संवाद करायला ओक तय़ार आहेत. मात्र त्याआधी दाभोळकर व नारळीकरांनी स्वतःच्या व अन्य १० जणांच्या संदर्भात नाडी भविष्याची शास्त्रीय कसोटी मद्रासला जाऊन ओकांच्या उपस्थितीत करून घ्यावी लागेल. अशी अट यासाठी की त्यांच्या उपस्थिती शिवाय कसोटी न करता केलेली चर्चा निरर्थक होईल... त्यामुळे अंनिसने अन्य कितीही ओंकारांना पाठवून काहीही उपयोग नाही.

■ त्यामुळे सवंग जाहिरात करण्यासाठी केलेली कुठलीही कृती अंनिसचा बेगडीपणा निर्णायकपणे उघडकीस आणेल.

वरील लेखनातील मद्रासला जाऊन नाडी भविष्याची शास्त्रीय कसोटी करा. असे १९९६-९७ सालातील तात्कालिक घटनाक्रमातून लिहिले गेले होते. आता परिस्थिती फार बदललेली आहे. आता इच्छा असेल तर अशी कसोटी घ्यायला इतके दूर जायची ही गरज उरलेली नाही. नाडी ग्रंथ केंद्रे पुणे, मुंबई, नागपूर नव्हे कोल्हापुर, सोलापुर, सांगली, नाशिक, जळगाव-धुळे, अकोला सारख्या ठिकाणीही उपलब्ध आहेत.

कदाचित यावर अधिक लिखाणासाठी विचारणा केली गेली तर पुढे पाहू. ...

# २०. नाडीग्रंथ भविष्य आणि नवग्रह शांती अर्थात कर्ममहात्म

## लेखक – प्रा अद्वयानंद गळतगे



नाडी ग्रंथ प्रेमी विंग कमांडर शशिकांत ओक यांनी प्रस्तूत लेखकाला पुढील प्रश्न विचारला होता.

आपल्या लिखाणात नवग्रह मानवावर प्रभाव टाकत नाहीत, ते एका फल ज्योतिष नामक व्यवस्थेचा भाग आहेत. असे म्हणता, ते योग्यच आहे. मात्र नाडी ग्रंथात नवग्रह मंदिरात जाऊ शांतीपुजा करा असे सांगितले जाते. जर नवग्रह प्रभाव टाकत नसतील तर पूजेचा उपयोग काय? असे वाटून वाचकांचा संभ्रम होण्याची शक्यता आहे. यावर आपण प्रकाश टाकावा. हा प्रश्न महत्त्वाचा आहे यात शंका नाही. या प्रश्नात तीन मुद्दे आहेत.

१. ग्रह मानवावर प्रभाव पाडत नाहीत. (कारण ते एका व्यवस्थेचा भाग आहेत.)

२. नाडीग्रंथात नवग्रह मंदिरात जाऊन शांती – पुजा करण्यास सांगितले जाते.

३. ग्रह मानवावर प्रभाव पाडत नसतील तर त्यांची शांती–पुजा करून काय उपयोग?

प्रथम पहिला मुद्दा घेऊ. या मुद्यातील विषय माहित नसावा. म्हणून त्या विषयी सांगितले पाहिजे. कारण तो मुद्दा परंपरागत ज्योतिषातील कल्पनेच्या विरुध्द आहे. परंपरागत ज्योतिष मानवीजीवनावर प्रभाव पाडतात असे मानते. किंबहुना या कल्पनेवरच पूर्णपणे आधारित आहे. त्याच्या उलट ग्रहांच्या व्यवस्थेच्या कल्पनेत ग्रह मानवावर प्रभाव पाडत नाहीत, असे मानण्यात येते. ही ग्रहांच्या व्यवस्थेची कल्पना प्रस्तूत लेखकाने आपल्या विज्ञान आणि अंधश्रद्धा निर्मूलन, आणि विज्ञान आणि चमत्कार या दोन ग्रंथात सविस्तर मांडली आहे. मात्र ही कल्पना लेखकाची नसून ब्रह्म विज्ञानाची आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे. कारण ते सत्य ब्रह्म विज्ञानातील,' आकाश लेखन ' या वास्तवावर आधारलेले आहे. (या 'आकाश' विषयाची ब्रह्म वैज्ञानिक माहिती छांदोग्य व तैतिरीय उपनिषदात सूत्र रूपाने दिली आहे.)या आकाश लेखनाविषयीचे वस्तुनिष्ठ पुरावे महत्वाचे असून ते प्रस्तूत लेखकाने आपल्या उपर्युक्त 'चमत्कार' ग्रंथात तीन क्षेत्रातून दिले आहेत. पहिले क्षेत्र 'अर्थ पूर्ण घटना ' यांचे आहे. दुसरे क्षेत्र 'खरी ठरणारी स्वप्ने व भाकिते' यांचे आहे.

तिसरे क्षेत्र ' नाडी ग्रंथातील भविष्यकथन 'हे आहे. येथे आपल्याला फक्त नाडी ग्रंथातील भविष्य कथनाचा विचार कर्तव्य आहे.

**नाडीग्रंथात –** विशेषतः अगस्त्यादि अंगठ्याच्या ठशांवरून सांगितले जाणाऱ्या नाडीग्रंथात– भविष्य

पहाणाऱ्या व्यक्तीचे नाव व जन्मवेळ - त्यावेळची ग्रहस्थिती अगदी अचूकपणे सांगितली जातात. जी व्यक्ती अजून जन्मलेली नाही, तिची ही माहिती नाडी महर्षींना ती व्यक्ती जन्मण्यापुर्वीच कुठून मिळते हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न असून त्याचे ब्रह्म विज्ञानाचे उत्तर असे की ही माहिती त्यांना आकाशलेखनातून मिळते. 'आकाश' रूपी कॅनव्हासवर प्रत्येक व्यक्तीच्या जन्माची व त्यावेळच्या ग्रह स्थितीची नोंद अगोदरच करून ठेवली असून नाडीग्रंथकर्ते महर्षी

आपल्या योगसिद्धीमुळे ती वाचू शकतात. याच नोंदी नाडीग्रंथात त्यांनी लिहून ठेवल्या आहेत. या नोंदीनुसारच प्रत्येक व्यक्तीचा जन्म होतो.

याचा अर्थ असा की कोणत्या ग्रहस्थिती खाली कोणती व्यक्ती जन्मणार आहे हे अगोदरच निश्चित केले गेले आहे. म्हणजे ग्रहांची भ्रमणे व व्यक्तींचे जन्म हे अगोदरच ठरलेले आहेत. या ठरलेल्या 'व्यवस्थे' नुसारच प्रत्येक व्यक्तीचा जन्म व तिच्या जीवनातील इतर घटनाही घडत असतात. या पूर्वनियोजित 'व्यवस्थे' मुळेच ग्रहांचा मानवावर प्रभाव पडत असल्याचा भास होतो. पण मुळात ग्रह मानवावर कसलाच प्रभाव पाडत नाहीत. दोन घटना जेव्हा एकत्र घडतात तेव्हा एक घटना दुसरीवर प्रभाव पाडत आहे अशी माणसाची अर्थात चुकीची समजूत होते. समजा भूकंप होत असताना एक स्त्री बाळंत झाली, तर ती त्या भुकंपामुळे झाली असे ठरत नाही किंवा भूकंपाचा त्या गरोदर स्त्री वर प्रभाव

पडला व ती बाळंत झाली असे कोणी म्हणत नाही. भुकंप व बाळंत होणे या दोन घटना एकाच वेळी योगायोगाने घडल्या आहेत असेच कोणी म्हणेल. त्याचप्रमाणे ग्रहांची आकाशातील स्थिती व एखाद्या व्यक्तीच्या त्या स्थितीतला जन्म या दोन स्वतंत्र घटना असून त्यांच्यात कार्यकारण संबंध नाही. विशिष्ट 'व्यवस्थे' मुळे त्या दोन घटना एकाच वेळी घडल्या आहेत इतकेच.

अशा रितीने ग्रहांचा मानवावर प्रभाव पडत नसेल तर नाडी ग्रंथात त्यांची शांती-पुजा करण्यास का सांगितले जाते? (वरील प्रश्नातील दुसरा मुद्दा ) त्या पूजेचा काय उपयोग? ( तिसरा मुद्दा) असे साहजिकच प्रश्न निर्माण होतात. येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की ब्रम्हविज्ञानानुसार ग्रहांची शांतीपुजा ही खरे तर त्या व्यक्तीची आपल्याच कर्मांची शांती पुजा असते. ग्रह हे त्या व्यक्तीच्या कर्मांची केवळ प्रतिके (symbols) आहेत. त्या प्रतिकांची शांतीपुजा म्हणजे त्या व्यक्तीची आपल्या कर्माची शांतीपुजा असते. त्या शांतीपुजेचा त्या व्यक्तीला आपले कर्म सुसह्य करण्यासाठीच उपयोग होतो. कर्म तीव्र वा बलवत्तर असेल तर ते त्याच्या शांतीसुसह्य होते;आणि सौम्य असेल तर शांतीपुजेच्या रूपाने (नाडीग्रंथात सांगितलेला खर्च करून) भोगले जाते. पण कर्म भोग भोगलाच पाहिजे, त्यापासून सुटका नाही.

आकाश लेखनतील नोंदीवरून नाडी महर्षींना प्रत्येक व्यक्तीचे कर्म माहित झालेले असते. आपल्या कर्माची म्हणजे कर्म देवतेची ग्रह देवतेच्या

रूपाने कोण पूजा करणार आहे व कोण करणार नाही, हे ही आकाश लेखनतील नोंदी वरून महर्षींना माहित झालेले असते. हेच आहे. (विश्वातील सर्वच घटनांची नोंद आकाशलेखनात असते हे लक्षात ठेवावे) ज्यांना शांतीपुजा करूनही काही परिणाम दिसून येत नाही, त्यांचे

कर्म बलवत्तर असल्यामुळेच दिसून येत नाही; व ते सुसह्य होण्यासाठीच ती शांतीपुजा सांगितलेली

असते. प्रत्येकाला आपल्या कर्मानुसारच शांती-पुजेचा अनुभव येतो हे यावरून समजून घ्यावयाचे आहे.

ही गोष्ट एका उदाहरणाने स्पष्ट करता येईल. समजा आपल्याला विद्या प्राप्त व्हावी म्हणून आपण विद्या देवतेच्या किंवा गुरूच्या प्रतिमेची पूजा केली, तर त्या पुजेमुळे आपल्याला विद्या मिळेल काय? पण एकलव्याला द्रोणाचार्य या गुरूच्या प्रतिमेची पुजा केल्यामुळे धनुर्विद्या प्राप्त झाल्याची महाभारतात कथा आहे. पण प्रत्यक्षात एकलव्याला केवळ द्रोणाचार्यांच्या प्रतिमेच्या पुजेमुळे ती विद्या प्राप्त झालेली नसून स्वत:च्या धनुर्विद्येच्या अभ्यासामुळे म्हणजे स्वत :च्या कर्मामुळे ती त्याला प्राप्त झाली, ही वस्तुस्थिती आहे. द्रोणाचार्यांची प्रतिमा हे एक निमित्त आहे. धनुर्विद्येचे ते एक प्रतीक आहे. एकलव्याचे कर्म धनुर्विद्येचा अभ्यासहेच त्याला ती विद्या प्राप्त होण्यासाठी प्रत्यक्षात कारणीभूत ठरले. एकलव्याला याच जन्मातील कर्मामुळे फळ मिळाले, नाडी भविष्य पाहणाऱ्या व्यक्तीला पुर्व जन्मातील कर्मामुळे शांतीपुजेचे फळ मिळत असते, हा कर्म सिद्धांत शांती पूजेच्या रुपाने सांगितला आहे. किंबहुना नाडीग्रंथ लिहिण्याचा महर्षिंचा उद्देशच कर्म सिद्धांत सांगणे हा आहे.

टीप :- हजारो व्यक्तींच्या जन्मकुंडल्या मिळवून संख्याशास्त्राच्या आधारे ग्रह ज्योतिषाचा 'शास्त्रीय' पाया घालणाऱ्या मायकेल गोकलाँ या फ्रेंच संशोधकाची कर्म सिद्धांताच्या ज्ञानाच्या अभावी कशी दिशाभूल झाली आहे हे 'ग्रहांचा मानवावर प्रभाव पडतो ' ह्या त्यांच्या निष्कर्षावरून दिसून येते. विशिष्ट ग्रहाखाली जन्मणाऱ्या व्यक्तीमधे विशिष्ट गुण प्रवृत्ती आढळून येते म्हणून ग्रहच ती गुण प्रवृत्ती निर्माण करतात किंवा ग्रहाच्या प्रभावाचा तो परिणाम आहे. हा त्याने काढलेला निष्कर्ष तर्कदुष्ट आहे, शास्त्रीय नाही. वरील उदाहरणातील भूकंप झाल्यानंतर एक बाई बाळंत झाली, म्हणून भूकंप हा तिच्या बाळंतपणाचे कारण आहे असे åhUÊ¶ng ndl oA rho hm VH$Xnb post hoc ergo propter

hoc म्हणून प्रसिद्ध आहे. म्हणजे दिवसानंतर रात्र येते म्हणून दिवसच रात्रीचे कारण आहे असे समजण्याचा तर्कदोष आहे. या तर्कदोषाला खगोलविज्ञानातील पृथ्वीच्या गतीचे असे अज्ञान कारणीभूत आहे, असे गॉकलाँच्या तर्कदोषाला त्याचे ब्रह्मविज्ञानातील कर्माच्या गतीचे अज्ञान कारणीभूत आहे. पण या तर्कदोषामुळे त्याला विलक्षण सिद्धांत मांडावा लागला आहे. हा विलक्षण सिद्धांत म्हणजे स्त्रीच्या उदरातील गर्भ आकाशातील ग्रहस्थिती पाहून आपला जन्मकाळ स्वत:च ठरवतो व जन्मतो. आकाशातील ग्रहस्थितीचे हे ज्ञान त्या गर्भाच्या मेंदूला होते म्हणे! ज्योतिषासारख्या विषयात सुद्धा पाश्चात्य मनावरील भौतिक वादाचा पगडा कसा सुटत नाही याचे हे उत्तम उदाहरण आहे. स्त्रीच्या उदरातील गर्भाच्या मेंदूला आकाशातील ग्रहस्थितीचे ज्ञान होते अशी कल्पना मांडणारा गॉकलाँ हे विसरला की तो गर्भ जेंव्हा जन्म घेतो, त्या वेळेची ग्रहस्थिती निर्माण व्हायची झाल्यास त्याच्या बरोबर ९ महिने अगोदर त्याच्या मातापित्यांच्या संभोगातील त्यांच्या स्त्री पुरूष बीजांचा परस्पर संयोग घडून यायला पाहिजे, तरच तो गर्भ ९ महिन्यानंतर त्या विशिष्ट ग्रहस्थितीखाली जन्म घेऊ शकेल. आता त्याच्या मातापित्यांच्या स्त्रीपुरूषबीजांचा संयोगकाल कोण ठरवतो व कसा ठरतो? या प्रश्नाचे उत्तर ' गर्भाच्या मेंदूचे ज्ञान' हे असू शकत नाही. कारण त्यावेळी गर्भच अस्तित्वात नसतो. (उलट त्या बीजसंयोगातूनच तो निर्माण होणार

असतो)'ग्रहांचा प्रभाव' हेही त्याचे उत्तर असू शकत नाही. कारण प्रत्यक्षात व्यक्तींच्या जन्मकाली ग्रहांचा प्रभाव चालू होतो. हे फलज्योतिषाचे मुलभूत गृहीतकृत्य आहे. या प्रश्नाचे उत्तर ब्रह्मविज्ञाच देऊ शकते. ब्रह्मविज्ञानानुसार हा काळ जन्मणऱ्या व्यक्तीचे पूर्वकर्म ठरवते. आणि ते कर्मदेवतेच्या माध्यमातून आकाशलेखनाच्या नोंदीनुसार ठरवले जाते. व्यक्तीची गुणप्रवृत्ती ग्रह ठरवत नसल्याचे खुद्द गॉकलॉँच्या आणखी एका संशोधनानेच सिद्ध झाले आहे. शस्त्रक्रियेने कृत्रिमपणे (सिझेरियन पद्धतीने) जन्मलेल्या व्यक्तीवर तिच्या जन्मवेळच्या ग्रहांचा प्रभाव पडत नसल्याचे त्याला आढळून आले आहे! सिझेरियनने जन्मलेल्या व्यक्तीवर त्या वेळच्या ग्रहांचा प्रभाव का पडू नये याचे उत्तर गॉकलॉँकडे नाही! ग्रहांचा प्रभाव पडतो हे खरे असले तर सिझेरियनने जन्मलेल्या व्यक्तीवर तो प्रभाव पडावयास नको काय? मग तो का पडत नाही? कारण माणसाची गुणप्रवृत्ती त्याच्यापुर्व जन्मातील कर्मामुळे ठरते त्याच्या जन्मवेळेच्या ग्रहांमुळे, ग्रहांच्या प्रभावामुळे नाही.

❒❒❒

## भृगु संहितेच्या शोधात नेपाळ यात्रा



मेरठच्या भगुसंहिता केंद्रात विपिन दीक्षित ताडपत्रावरील पाली लिपीतील फल दाखवताना



जन्मपत्रिका करेक्शन यंत्र सध्या कॉम्प्युटरवरील कुंडली मिलानमुळे फारसे वापरात नाही.

नेपाळमधे भृगुसंहितेचा साठा आहे असा दावा अनेक भृगु शास्त्री करता आढळतात याचा शोध घ्यायला फेब्रुवारी २०१५ मधे एक शोधयात्रा जळगावचे विवेक चौधरींसमावेत पुर्ण केली गेली. काठमांडूच्या राष्ट्रीय अभिगारात भृगु संहितेचा नेपाळखंड डिजिटलाईज करून सुरक्षित केला गेला आहे. त्याचा कॅटलॉग हाती आला. परंतु नंतर भुकंपाचे निमित्त होऊन पुढील शोधकार्याला विलंब होऊ लागला आहे. ८ दिवसांच्या यात्रेत तेथील एफएम रेडियोवरील मुलाखतीतून एव्हरेस्ट पासून ते अगदी सर्व कानाकोपऱ्यात भृगु संहितेच्या पट्ट्या असतील तर शोधकार्याला द्याव्यात असे आवाहन नेपाळी भाषेत पोहोचले. नेपाळच्या अन्य महत्वाच्या वाचनालयातून व भाषणातून अनेक ज्योतिषाचार्यांनी हे काम करायला पुढाकार घेतला आहे. या कामी सानू थापा नामक सनातन संस्थेच्या साधिकेचा फारच उपयोग झाला. यातील पुढील भाग म्हणून मेरठ आणि अलाहाबादपासून ५० किमी दूर प्रतापगढयेथील भृगुसंहिता केद्रातील पट्ट्या व लिपीचा अभ्यास करायला नमुने गोळा केले गेले.

# २१. तेरा काम हो जाएगा



स्वत:ला 'धिस बेगर' म्हणवणारे योगी एका हातात 'ताडाचा पंखा' आणि दुसऱ्या हातात करवंटीधरून रस्त्यात उभे अगस्त्य नाडीमधील ९व्या कांडातून मला एका पौर्णिमेला पांडेचरीच्या अरविंद आश्रमात जाऊन तेथे ध्यानाला बसावे असा आदेश आला. त्या प्रमाणे मी तेथे बुद्धपौर्णिमेला (मे१९९४) गेलो. नंतरच्या आदेशाप्रमाणे योगी रामसूरत कुमारांच्या तिरुवन्नमलाईच्या आश्रमात गेलो. योगी रामसुरत कुमार मुळचे उत्तरभारतीय असून ते कित्येक वर्षे तमिळनाडूत राहिल्याने तेथीलच एक बनले होते. ते कोणाशीही न बोलता फेऱ्या मारत. जमलेल्यांना हाताच्या इशाऱ्याने आशीर्वाद देत. असे ते करत असताना त्या दिवशी त्यांनी 'तेरा काम हो जाएगा' असे हिंदीतून जोरात ओरडून म्हटले होते. जमलेले सर्व भविक लोक तमिळ भाषी असल्याने त्यांना उद्देशून हिंदीतून असे म्हटलेले वाक्य अचंभ्यात टाकणारे होते. ते बोल माझ्यासाठी होते असे मला नंतर जाणवले. याबाबतचे माझे विचार माझ्या एका लेखातून (नाडी भविष्य आवृत्ती १ पान ३४ ते ३६) प्रकाशित झालेले असल्याने त्याचा उल्लेख मी इथे टाळत आहे.

मध्यंतरीच्या काळात पुन्हा पांडेचरी व तिरुवन्नमलाईच्या आश्रमांना भेट करावी म्हणून ठरवले. सौ. अलका व मी पांडेचरीच्या बसमधे चढलो. संध्याकाळची वेळ. सुसाट वेगात बस चाललेली. त्यात गप्पांना रंग आलेला. होता-होता दिंडीवनम् गाव आले. आणि आम्ही दुसऱ्या बसमधे चढलो. पुन्हा गप्पा चालू झाल्या. पांडेचरीला काय खरेदी करायचे वगैरे ठरत होते. अचानक मी ट्रान्समधे गेल्याप्रमाणे बोलू लागलो, 'ते पुस्तक असेल पण मासिकाच्या आकारात, किंमत १०-१२ पर्यंत असेल, वर महर्षींचा फोटो, ५०-६० पाने असतील'. मधेच असे तुटक तुटक बोलणे तिला कळेना. मी मात्र विचारात इतका रंगलो की नंतरची खरेदी, हॉटेलात खाणे, राहणे हे माझ्या लेखी काही नव्हतेच. शेवटी 'आता थांबणार का?' असा सौंकडून पुकारा झाला. तेंव्हा ती २-३ तासांची तंद्री हळू हळू कमी झाली. त्यानंतर योगी रामसूरत कुमारांच्या आश्रमात घडलेल्या विलक्षण घटनेचा तपशीलवार उल्लेख पुस्तकात केला गेला आहे. त्या दिवशी आम्ही घरी परतलो. तेंव्हा मध्यरात्र झाली असताना देखील माझ्या फाईल मधून मीच माझ्या हाताने नवव्या कांडातील वर्णनाची टेपचालवून मराठीत भाषांतर केलेल्या मजकुराचा कागद पत्नीच्या हातात दिला. त्यात लिहिलेले होते, 'एका अमावास्येला योगी राम सूरत कुमारांच्या आश्रमात जाणे होईल. सोबत एक व्यक्ती असेल. त्यावेळी जमलेल्या लोकांसमक्ष योगी त्याला कृपा आशीर्वाद देतील तेंव्हा उपस्थित सर्वांना चकीत व्हायला होईल. भिंतीवरील कालनिर्णय दिनदर्शिकेतील ७ ऑगस्ट १९९४ तारखेचे वर्णन 'अमावास्या' असे होते ते पत्नीला दाखवले. तेंव्हा तीही त्या दिवशी आश्रमात घडलेला अदभूत प्रकार आठवून थक्क झाली.

त्या दिवशी सकाळी बसच्या प्रवासात अचानक मी हिंदीतून एक चिठ्ठी बनवली. त्यात मी म्हटले होते - 'अगस्त्य महर्षींच्या नाडी ग्रंथ भविष्यातील ९व्या कांडातील आदेशाप्रमाणे हा जीव आपल्या समोर प्रस्तूत आहे . - शशिकांत '. योगींच्या भेटीला सर्वांना रांगेने आत सोडायला लागल्यावर मी ओळ मोडून तडक

आत गेलो व योगींच्या अगदी जवळ जाऊन त्यांच्या पायापाशी ती हिंदीतून लिहिलेली चिठ्ठी व पेन ठेवले व योगींच्या फेरी मारण्याच्या वाटेवर फतकल मारुन बसलो. योगी रामसूरत कुमार कोणाशीही बोलत नसत. स्त्रिया व पुरुषांच्या वेगवेगळ्या भागात विभागणी केलेल्या चिंचोळ्या वाटेत ते अधुन-मधून फिरत व उपस्थितांना आशीर्वाद दिल्यासारखा हाताने इशारा करत असत. त्यांच्याशी संवाद साधणे एरव्ही शक्य नव्हते. अशा परिस्थितीत तेथल्या व्यवस्थापनाची शिस्त मोडली गेल्याने बराच हंगामा झाला. आधीच्या भेटीत ओळखीचे झालेले टी. एस. मणी मॅनेजर धावले. त्यांनी ती चिठ्ठी व पेन उचलून आपल्या खिशात टाकले. मला उद्धेशून म्हणाले, 'हीच का एअरफोर्सची शिस्त?' मी वरमलो.



माँ देवकी योगींना वारा घालताना

पत्नीच्या डोळ्यात पाणी आले. असा पाणउतारा कोणी केला नसल्याने तिला ते सहन झाले नव्हते. नंतर ती चिठ्ठी वाचून त्यांनी परत योगींच्या पुढ्यात ठेवली. त्यांची सेवा करणाऱ्या पट्टशिष्या माँ देवकी यांनीही ती चिठ्ठी पाहिली. हिंदीतील असल्याचे पाहून परत योगींच्यापाशी दिली. ती चिठ्ठी योगींनी चष्मा घालून वाचल्याचे सर्वांनी पाहिले. नंतर योगींच्या शिष्यगणांनी भजनाला आरंभ केला. कडाक्याचे भजन चालू असताना योगी उठले व फेऱ्या मारत असताना अचानक माझ्या जवळ येऊन बसले. माझे हात हातात घेऊन कुरवाळत माझ्याशी बोलले. नंतर आपल्या जवळ बसायला सांगितले. एका अमेरिकन शिष्याने त्यांच्यावर केलेल्या कवितासंग्रहाचे पुस्तक मला भेट म्हणून देत त्यावर व माझ्या मराठी पुस्तकावर, 'ओंम शशिकान्त' असे देवनागरीत लिहून मला परत दिले. मला वेळोवेळी जवळ बोलावून हात हातात घेऊन, काही पुटपुटत त्यांनी मला कृपा आशीर्वाद देऊन उपकृत केले. जणू काही मंत्रोच्चार करून ते शिष्यत्व देत होते. ते सर्व आठवून पत्नीला भारावून गेल्यासारखे झाले. तिची नाडी भविष्याकडे व माझ्या कार्याकडे पहायची दृष्टी बदलली. असो.

ता.क.

तेरा काम हो जाएगा या योगी राम सूरत कुमारांच्या विधानाचा प्रत्यय मला वेळोवेळी आला व पुढेही येत राहिला. एका संध्याकाळी सर्वांसमक्ष काकभुजंदर नाडीचे मोठ्याने वाचन झाल्यावर त्यामधील कथनाचा गोषवारा आमच्या सारख्या तमिळ न समजणाऱ्यांसाठी सांगताना रमणी गुरुजींनी म्हटले, 'समस्त महर्षींचे आशीर्वाद तुला या नाडीवरील कामामुळे लाभले असल्याने, यापुढे तू हे काम निष्काम भावनेने करशील तेंव्हा तेंव्हा तुला आमची सतत मदत होईल' असा आश्वासक आशीर्वाद दिला. कालांतराने अनेक प्रती विकत गेल्या. होता होता आज अशी वेळ आली आहे की माझ्याजवळ तमिळच्या दोन हजारापैकी व मराठीतील पहिल्या आवृत्तीच्या पाच हजारापैकी फक्त एक-एक प्रत आठवण म्हणून शिल्लक आहे.

हिंदीतील, नंतर इंग्रजी, गुजराथी पुस्तक कसे आश्चर्यकारकपणे प्रसिद्ध झाले. नाडी भविष्याच्या संदर्भातील झालेल्या संपूर्ण पत्रव्यवहारावर आधारित बोध अंधश्रद्धेचा या पुस्तकाने अंनिसची त्रेधा तिरपिट कशी उडवली व भल्या भल्यांची कशी भंबेरी उडवली त्याचा इतिहास, 'इतिहास पत्रिका प्रकाशन' ठाणेतर्फे डॉ. विजय बेडेकरांनी रचला.

❒❒❒

# २२. नाडी केंद्रांतून आणखी चांगली सेवा कशी मिळू शकेल ?

नाडी ग्रंथ प्रेमी हो,

आपण नाडी केंद्रचालकांच्याकडून आणखी चांगल्या सेवेची अपेक्षा करतो. त्यासाठी काही सूचना नाडी ग्रंथ प्रेमींतर्फे मी खाली मांडत आहे. त्यांचा नाडी केंद्र चालकांनी एकत्र येऊन विचार करावा व त्यावर शक्य तितक्या त्वरेने अंमलबजावणी करावी, अशी सर्व नाडी केंद्र चालकांना विनंती करण्यात येत आहे.

१. ताडपट्टीतून कूट तमिळ नाडी भविष्य वाचन करणे अत्यंत कौशल्याचे व किचकट काम आहे. त्याचे प्रशिक्षण आपल्या कुशल मार्गदर्शनाखाली करून आपण आपले शिष्यगण तयार करून ठेवण्याची प्रथा आहे काय?आपल्या केंद्रातून व्हिजिटर्स बुक्स ठेवता येतील काय? त्यामुळे भविष्य पाहून गेलेल्यांना काय वाटते याची नविन भेट देण्याऱ्यांना कल्पना येईल.

२. आपल्या केंद्रातील स्टाफ आपल्या प्रमाणे रोज सकाळी स्नान,जप, मंत्र, पूजा, आरती आदी साधना कर्मे करून मग भविष्यकथनाला सुरवात करतो का?

३. प्रत्येक व्यक्तीला नाडी ग्रंथांचे दर्शन होण्यापूर्वी केंद्रातील पूजारुममधे जाऊन महर्षींना श्रद्धापूर्वक 'माझी भविष्यकथन पट्टी मिळावी' अशी प्रार्थना करायला आपण सांगता काय?

४. नाडी केंद्रचालक स्पोकन इंग्लिशचे क्लासेस मधून इंग्लीश भाषा पटकन आत्मसात करू शकणार नाहीत काय?

५. नाडी केंद्रात आजकाल जन्मदिनांक व वेळ विचारली जाते. खरे तर तशी विचारायची पुर्वप्रथा नाही परंतु सध्या नवा पायंडा पाडून ते विचारले जाते. हे अत्यंत चुकीचे व घातक आहे. नाडी ग्रंथांचे वैशिष्ट्य आहे की त्यातून व्यक्तिची कुंडली मांडून येते असे जर असेल तर ग्राहकाकडून जन्मदिनांक व वेळ मागणे यातून नाडी ग्रंथांच्या वैशिष्ट्याला बाधा येते. अनेकांना या माहितीवरून आजकाल कॉम्प्युटरवरून कुंडली मांडणे सहज सोपे झाले असल्याने त्यातून ती बनवून आपल्याला ताडपट्टीतून ती मिळत असल्याचा आभास केला जात आहे असे वाटणे सहाजिक आहे. म्हणून आपण असे विचारणे तात्काल थांबवावे. हां, आपण काही विशिष्ठ सालाच्या नंतरच्या नाडीपट्ट्या मागवल्या असतील व ग्राहकाच्या जन्म सालानंतरच्या त्या असतील तर शोधात वेळ न जावा म्हणून आपण जन्मसाल विचारले तर ते एक वेळ चालेल पण जन्म दिनांक व वेळ विचारणे सर्वस्वी गैर आणि नाडीग्रंथांविषयी संशय निर्माण करणारे आहे याची नाडी केंद्रातील वरिष्ठांनी नोंद घेता येणार नाही काय?( असे आम्ही करायचे थांबवू असे काही केंद्रांनी म्हटले आहे)

६. अचुक पट्टीचा शोध घेताना प्रत्येक वेळी आपले नाव किंवा अन्य माहिती क, च, छ, त, प, र किंवा क,का,कि,की, किंवा दोन/तीन अक्षरी आहे का? असे अनेकदा विचारून शोधण्याचा प्रयत्न करता, त्यापेक्षा पट्यांतील नावे वाचून (सुरवातीला फक्त आईचे व/किंवा वडिलांचे, ते जर जुळले तरच मग त्या व्यक्तीचे) ते नाव जुळते का असे करता येणे शक्य आहे का? त्यामुळे सामान्य लोकांना जे वाटते की आपल्याकडून माहिती काढून तीच पट्टीतून सांगितली जात आहे असे भासवले जाते. या आक्षेपाचा प्रश्नच उद्भवणार नाही काय? (लेखकाच्या आग्रहामुळे निदान त्याच्या समोर तसा शोध घ्यायला लागल्याचे जाणवते)

७. नाडीपट्टी सापडली की त्यात व्यक्तीचे नाव कुठे व कसे कोरून लिहिलेले आहे, ते जरी एखाद्याला

तमिळ येत नसेल तरी आवर्जून दाखवले जाते काय?

८. नाडी पट्टीतील व वाचकांची भाषा तमिळ. सामान्य लोकांच्या पेक्षा वेगळी असल्याने भाषांतरकाराची अत्यंत गरज असते. बऱ्याचदा भाषांतराचा दर्जा सुमार असतो. त्यामुळे विरस होतो असे वाटते. नाडीवाचकांचा वा भाषांतरकारांचा अनुभव कमी पडत असल्याने बऱ्याचदा भविष्यकथन चुकीचे किंवा पट्टीत न लिहिलेले कथन केले गेले असावे असे वाटत राहते. प्रत्येकाला पुन्हा-पुन्हा केंद्राच्या चकरा मारून अर्थाची फोड करून घ्यायला वेळ नसतो.यावर काय विचार करता येईल?

९. १४ नंबरच्या कांडातील जप-साधना वैदीश्वरन कोईल सारख्या दूरच्या गावी करण्यापेक्षा आपल्या केंद्रातून करणे शक्य आहे काय?

१०. आपल्या केंद्रात चढावा म्हणून काही कपडे, फळ-फळावळ, मिठाई, रोख रक्कम दिली जाते. त्याचा विनियोग आपण आपणासाठी करून उरलेल्या वस्तू गरजूंना द्याव्यात असे अपेक्षित असते. त्याप्रमाणे आपल्या केंद्रातून दान-कर्म कले जाते का?

११. आपल्या केंद्रात प्रतिष्ठित नाडीप्रेमींतर्फे आपण गरजूंना वेळोवेळी दान-कर्म करवून त्या वेळचे फोटो आल्बम करून किंवा भिंतीवर लावून ठेवले तर नंतर येणाऱ्यां लोकांना आपल्या केंद्रातून भविष्य कथनाबरोबर असे सामाजिक कार्यही केले जाते याची कल्पना येणार नाही काय?

१२. नाडी भविष्याला नावे ठेवण्याचा किंवा त्याचा अपप्रचार करण्याचा काहींचा छंद असतो तर काहींचा धंदा. या लोकांच्या उपद्रवापासून संरक्षण करण्यासाठी आपण एखाद्या निष्णात वकिलांची वेळीच मदत मिळण्याची व जवळच्या पोलिस केंद्रातून मदत मिळवण्यासाठी आपल्या सचोटीच्या धंद्याची माहिति करून देउन सोय केली आहेत काय़? (महाराष्ट्र राज्यात अंनिसच्या बाजूने कायदा असताना नाडी केंद्रांना गाफील राहून चालणार नाही.)

१३. एखाद्याची पट्टी मिळाली तर ती पट्टी त्याला का सुपूर्त केली जाणे शक्य नाही काय?

१४. तसे करता येत नसेल तर कॉम्प्युटरच्या सोईमुळे नाडी पट्टीतील तेवढाच भाग स्कॅन करून, वही व कॅसेट ऐवजी सीडी देणे शक्य आहे काय?

१५. बऱ्याच लोकांना त्यांच्या व्यस्त कार्यालयीन वेळेमुळे १० ते ६ या वेळेत नाडी केंद्रांना भेट देणे जमत नाही. त्यामुळे रविवारी/ सुटीच्या दिवशी फार गर्दी होते. केंद्रांनी त्यांच्या कामाची वेळ रात्री ९ पर्यंत वाढवली तर अनेकांची सोय होईल. सुटीच्या दिवसांवरील ताण कमी होईल.

१६. नविन गावात केंद्र उभारणीसाठी नाडी प्रेमींची कशी मदत होईल त्यांनी काय करावे?

१७. आपले केंद्र राहत्या सोसायटीच्या पार्किंग किंवा अन्य वैधानिक गरजा पूर्ण करते काय?

१८. आपल्या खालील कर्मचाऱ्यांच्या रजा, पगार, जेवण-खाण, औषधपाणी वगैरेची सोय केली आहे का?

१९. आपल्या केंद्रातून शाईचे आंगठे पुसण्यासाठी कपडा, स्वच्छ टॉयलेट्सची सोय आहे काय?

२०. आपला कर्मचारी वर्ग सर्वांचा मान आदबीने राखून व सचोटीने काम करतो काय?

या शिवाय नाडीप्रेमींनी आपले काही मुद्दे असल्यास मांडावेत, सांगावेत. त्यांचाही विचार आवर्जून केला जाईल.पुढील काळात नाडी केंद्रास भेट देताना वरील मुद्यांची काही अंमलबजावणी होत आहे का याची जागरूकपणे नोंद करावी. ही नाडीप्रेमींना नम्र विनंती.

नाडी ग्रंथ प्रेमी सेंटर तर्फे विचारार्थ सादर

❑❑❑

## २३. पूज्य रमणी गुरुजींचे पुण्यात जीवनाडी कथन :



काकभुजंदर (भृशुंडी) या जीवनाडीचे वक्ता किंवा वाचक तांबरम येथील आश्रमांत असतात. कधी कधी ते पुण्यात येतात तेंव्हा पुण्यातील त्यांच्या चाहत्यांना ती पर्वणी असते. अशीच दि १ फेब्रुवारी २०१६च्या एका वाचनात प्रस्तूत लेखकाला उद्देशून जे वाचन केले गेले त्यातील काही कथन पुढील वाटचालीसाठी मार्गदर्शक होते. त्यातील काक भुजंदरांची वाणी, आर्जवी भाषा व बारकावे हैय्योहैय्यैयो यांच्या मराठीतील अनुवादामुळे प्रस्तूत लेखकाला प्राप्त झाले. त्याचा वृतांत सादर.

नाडीशास्त्र काय आहे?

हे बालका. ...! हे तू सर्व प्रथम जाणून अस. हा विनोदाचा किंवा विरंगुळ्याचा विषय नक्कीच नव्हे. नाडीशास्त्र हे संपूर्ण त्या सिद्धपुरुषांनी, साधू-तपस्वी आणि योगी जनांनी त्यांच्या अपार परिश्रमातून कठोर तपश्चर्यांतून आणि कष्टमय स्वसंयमनातून मिळवलेल्या अथांग त्रिकाल ज्ञानाचा एक भाग होय. लक्षांत घे, नाडीशास्त्राबाबत जे काही म्हणून आजमितीस ज्ञात आहे, ते त्या सहृदय आणि दयाळू महर्षींनी आपणास वाटून दिलेला केवळ एक छोटासा भाग आहे... त्या उपदेशास आचरणात आणून आपण निरंतर आशीर्वादांच्या परमोच्च स्थितीस प्राप्त होऊ शकतो. म्हणूनच नाडीशास्त्र हे परमेश्वरीय आशीर्वादाचे एक परम सर्वोच्च स्वरूप म्हणविले जाते.... बालका हे लक्षात घे, ह्या दिव्य दैवी शास्त्राबद्दल आपण इतकेच जाणू शकतो. ह्या विषयी जाणून घेण्यासारखे ह्यापेक्षा इतर काहीही नाही,...रे. काहीही नाही...

'शशिकांत' हे नाव कसे निर्देशिले गेले होते?

काही गोष्टी जाणून घेणे हा मानवी मनाच्या आवाक्याच्या पलिकडील विषय होय. जाणून अस, जसा चंद्र हा 'मना'चा सूचक आहे, तसाच तो 'माते'चाही सूचक आहे. काही विशिष्ठ गोष्टी जाणून घेण्याकरिता सुयोग्य मानसिक अवस्था आणि आदिमाया प्रकृतीचे अमर्याद आशीर्वाद हे दोन्ही एकाचवेळी प्राप्त असणे आवश्यक असते. ह्या विषयी तू अजिबात शंका बाळगू नकोस. हाच मानसिक अवस्था सुचवणारा 'चंद्र' तुझ्या नावाच्या प्रथम हा भागाचाही सूचक आहे. तर तुझ्या नावाचा दुसरा भाग हा खलाचा सूचक आहे. (तमिळभाषेमध्ये 'कान्त' कल्ल, हिन्दी भाषेत, 'सील'बट्टा/ मराठी भाषेमध्ये 'खल' बत्यातील खल) ह्या खलावर काहीही कितीही कुटले तरी त्याच्यात काहीही शिरत नाही. तो स्वतः अपरिवर्तनीय असतो. तोच गूण तुझ्यात अजून देखील आहे. तू तर कोणत्याही उपदेशाने अजिबात उपरत न होता, न बदलता... स्वतःच ठरवलेल्या स्वतःच्या एका विशिष्ठ मार्गावर नेहमीच क्रमरत असतोस नां... असो...!

हवाईदलातील कार्याबद्दल काक भुजंदर महर्षींचे बोल...

हे बालका,...! वृक्षाची वाढ ऊर्ध्वदिशेस जरी होत असली तरी, वृक्षाचे बीज हे नेहमी भूमिच्या खालीच स्वतःचे स्थान निर्माण करीत असते; अवकाशात नव्हे. तशीच तुझे कथाही असावी. परंतु गगनमार्गांशी तथा

अंतरिक्षातील वायुयानासंदर्भातील शास्त्राशी संलग्न असणाऱ्या एका शासकीय यंत्रणेमध्ये तू नियुक्त होतास. जेथून एखादा पवन रथ उत्प्लावन बळाच्या सहाय्याने स्वतःस गगनमार्गात झोकून देवून स्वतःचा असा एक मार्ग प्रशस्त करतो, तेथे तळसपाटीवर तुझे कार्यस्थान असे. त्या यंत्रणेत तुझी कार्यरेखा भूमिस्थित व्यवस्थापकाची होती. तेथील तुझ्या कार्यकाळातच तुला आकाशिय अभिलेखांच्या विषयात अभिरुची निर्माण झाली आणि या तुझ्या अभिरुची करिता तू स्वतच्या मर्यादा तोडून टाकून स्वतःचा असा एक मार्ग प्रशस्त केलास. त्या अनुषंगाने वाटचाल करीत असतानाच, साऱ्या थोरामोठ्या ऋषीमुनींना मानवंदना देत, त्या तुझ्या प्रवासात... तुझ्याकडून या दैवी शास्त्राबद्दल एक सामाजिक जागृतीही निर्माण केली गेली. बालका...! तुझा तो प्रवास मी फार सूक्ष्मतेने अवलोकिला आहे....(नव्या वाचकांच्या माहितीसाठी- प्रस्तूत लेखक हा हवाईदलातील विमाने जेथून अवकाशाचा ठाव घेत तेथे ग्राऊंड ड्यूटीज - अकौंट्स खात्यात व्यवस्थापन करत असे. तांबरमच्या पोस्टींगच्याकाळात अचानक नाडीग्रंथांची ओळख झाली. तमिळभाषा येत नसताना, ज्योतिषशास्त्राशी संबंध नव्हता तरी या विषयाची तळमळपुर्वक ओढ लागली. त्यासाठी त्याने हवाईदलातील काही संकेत मोडून लेखन कार्याला वाहून घेतले. आणि महर्षींच्या या महान कार्याची जनसामान्यांत जागृती व्हावी म्हणून जमेल तसे प्रयत्न केले.)

ह्या साऱ्या दैवीशास्त्रांविषयी तुला अभिरुची का उत्पन्न होते?

'हे सारे काही अकारणतः निश्चितच नव्हे हो...! लक्षांत घे, तुझ्या जन्मांतरीचे एक पवित्र बंधन हेच ह्या साऱ्या मागचे एकमात्र कारण आहे... ती अनुरक्ती, ती जिज्ञासा... तीच आजही... ह्या जन्मातही... जसा तू आहेस तसे घडविण्यास कारणीभूत आहे. मी जसे पाहतो आहे, तसे 'तारक' नामक शक्ती तुझ्या आधारचक्रात आहत झालेली आहे. तेथेच ती ब्रह्मप्रकाशामध्ये स्थित आहे.'

नाडीग्रंथांविषयी विचारांचे वर्णन

आजच्या आधीही नाडीशास्त्राविषयीचे तुझे प्रश्न घेऊन तू अनेक ठिकाणी गेला आहेस. तुझ्या मनांत शास्त्राविषयी अनेक संदेहही उत्पन्न होऊ गेले आहेत; नाडीशास्त्र बरे की वाईट हाही प्रश्न तुझ्या मनांत डोकावून गेलेला आहे. ह्या शास्त्राचे महत्व ते काय, अन त्याहीपुढे 'मूळ' आणि 'कूळ' काय येथपर्यंत तुझे सारे प्रश्न येऊन ठेपले आहेत. ह्या शास्त्राची तू सर्वप्रकारे परीक्षा घेवून तू पाहिलेली आहेस. हो ना? अनेक विभिन्न प्रकारचे अनुभवही तुझ्या गाठीशी आहेत. आणि तरीही नाडीशास्त्र हे संपूर्ण शास्त्र आहे की नाही असाही विचार तू कधी कधी करून जातोस. हे बालका... ! असले निरर्थक विचार करून तू स्वतःस आधिकाधिक ओझ्याखाली ढकलतो आहेस. असे तुला किंचितही वाटत नाही काय?

येत्याकाळात नाडीग्रंथवाचनासाठी तू त्याव्यक्तीशी संपर्क साधशील किंवा ती व्यक्ती तुझ्याशी संपर्क साधू शकेल... (खरोखरीच तसे घडले काय?) होय. काही काळात लगेच सुर्यस्वामी नामक संपुर्णपणे अनाहूत एक नाडीवाचक माझ्याशी आपणहून संपर्क करून माझे भविष्य कथन नेटवरून देवून गेला.

येत्याकाळात एका महात्म्याचा आशीर्वादपूर्ण दिव्य आशीर्वाद तुझ्यावर पडून त्या क्षणापासून आंतरिक मनःशांती अवश्य लाभेल. (खरोखरीच तसे घडले काय?)

होय. पुर्वकथनाप्रमाणे मी पत्नीसह आळंदीला

दर्शनाला गेलो असता मला ऑटोरायटिंग मधून 'सामान्य दिसणाऱ्या, शीघ्रकोपी, घराजवळील भागात स्थायिक' असे वर्णित चंदननगर भागातील चितळेबाबांचे पाद्यपूजन कर असा आदेश ज्ञानेश्वरांच्या गुरूंचे गुरू गहनीनाथांच्या नावाने आला. त्याप्रमाणे आम्ही नवनाथांचे आशीर्वाद प्राप्त चितळेबाबांची पाद्यपुजा आमच्या घरी बोलावून केली आणि मानसिक आनंद प्राप्त केला! त्यादिवसापासून थोरामोठ्या ऋषीमुनींचे, घोर तपस्वी महर्षींचे आशीर्वाद मिळण्याचा योग येत आहे. त्या आशीर्वादांच्या परिणाम स्वरूपात जे अनुभव पुढे यायचे आहेत, त्याच्या पूर्तीकरिता आदिमाया प्रकृतीचे आशीर्वाद मार्गातील अनेक अडथळे, जे पूर्वकर्माच्या पाठलागामुळे, तर काही बुद्ध्याअनुसरणाने आहेत ते दूर होऊ लागले आहेत.

...अरे खात्री बाळग, मी स्वतः काकभृशुंडी सांगतो आहे ना? भगवान अगस्त्य महर्षी आणि भृगु महर्षींनी पूर्वीच जा काही बीजे रोवून ठेवली आहेत, ती उगवताना तू पहा... ती बीजे तुझ्यापुढील वाटचालीला सहाय्यकारी ठरतील. (खरोखरीच तसे घडले काय?)

'सुर्यस्वामींनी महाशिव नाडीकथनातून आदेश मिळाले की निष्कलंक महादेव या स्थानाला भेट द्यावी. नंतर हरिद्वारला गंगेत स्नान करून अगस्त्य मुनींच्या गूफेत जावे'. त्याप्रमाणे जून २०१६च्या पहिल्या आठवड्यात गुजरातेतील कोलियाक या बंदरापाशी समुद्राच्या पाण्यात बुडलेल्या महादेवाचे दर्शन झाले. नंतर शेवटच्या आठवड्यात हरिद्वारच्या भृगुआश्रमात माता बाबाजींचे पावन आशीर्वाद मिळाले. गंगास्नानाचा लाभ झाला. शिवाय अगस्त्य गूफा शोधून त्या ठिकाणी साधना करायचा लाभ झाला!

❑❑❑

## अगस्त्य गूहेचा शोध आणि साधना



सेल्फीतून भाविकासह गूहेचे अंतस्थ दर्शन ⇦



अगस्त्य मुनीगूफेचे दुरून दर्शन ⇨

अजमेरहून पुष्कर सरोवराच्या प्रवासात ऑटोच्या चालकाने गुफा कुठे आहे ते मला माहित आहे म्हणालो ते खोटे होते असे सांगून मला चकीत केले. मात्र अगस्त्य महर्षींनी वाटेत एका व्यक्तीची जणूकाही नेमणूक करून ठेवली होती असे एक ग्रहस्थ वाटेवरील चौकशीत गाठ पडले आणि ती आडवाटेला पहाडात लपलेली गूहा विनायास सापडली. त्या ग्रहस्थांना उंच चढायला जमणारे नव्हते म्हणून त्यांनी त्यांच्या पुतण्याला बाईकवरून यायला मोबाईलवरून फर्मावले. २० मिनिटांची दमछाक झाल्यावर त्या गूहेत रांगत आत प्रवेश केला. तर तिथे आधीच एक भाविक ध्यानस्थ बसलेला होता. मी जप करायला बसायच्या ऐनवेळी अगस्त्यांचे मंत्र व्हाट्स ऍपवरील मेसेजमधून त्याच वेळी मला हातोहात मिळाल्यावर महर्षी आपली किती काळजी घेतात याचा प्रत्यय येऊन धन्य वाटले.